






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३४२ ऑक्टोबर ते डिसेंबर २०१२



महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे
शताब्दिपूर्ती २०१२-१३

**मा. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले**

८६व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

अनुक्रमणिका



**लग्न ?**

**सुखाचा अंगरखा पांघरून -**

**भोगलेलं दुःख -**

**कल्पनेपलिकडच्या**

**डॉक्टरी**

**सत्यकथा**

# गोष्टी लग्नाच्या।




पुस्तक प्रकाशित झाले.

लेखक :

**डॉ. अरविंद संगमनेरकर**

एम.डी.,डी.जी.ओ., एफ.आय.सी.एस,
एफ.आय.सी.ओ.जी.
स्त्रीरोग व प्रसूतीशास्त्र तज्ज्ञ
संपादक - शतायुषी

डॉक्टरांना भावलेलं आणि त्यांनी हळूवारपणे टिपलेलं,
भेदक सत्य.
वाचायलाच पाहिजे असा, संग्राह्य कथासंग्रह.





महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३४२, ऑक्टोबर ते डिसेंबर २०१२








**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष ०२०-२४४७५९६३
(कार्यालयाची वेळ : सकाळी ९.३० ते ११.३० दुपारी ४.३० ते ७.३०)

अनुक्रमणिका








# अनुक्रमणिका






मुद्रक-प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी,**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

अक्षरजुळणी
**एच्. एम्. टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

कव्हर डिझाईन : **श्री. हेमंत सरदेसाई**
भ्रमणभाष : ९३२६०७०९३४

**किंमत : १५/- रुपये**

प्रकाशन : डिसेंबर, २०१२


*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*





मुखपृष्ठ परिचय

## डॉ. नागनाथ कोत्तापल्ले

८६ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन (चिपळूण)चे अध्यक्ष



***डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचे अभिनंदन!***

*डॉ. कोतापल्ले यांचे व्यक्तिमत्त्व बहुस्पर्शी आहे. मराठीचे अध्ययन आणि अध्यापनावरोवर महाराष्ट्राच्या आणि देशाच्याही सांस्कृतिक व सामाजिक पर्यावरणाचे भान असलेले, साहित्यिक संस्था आणि संस्थात्मक प्रशासकीय अनुभवाने लेखनाला एक तर्कशुद्ध-अभ्यासाची शिस्त असलेले साहित्यिक म्हणून ते ओळखले जातात.*

*१९७७ ते २०१०-११ पर्यंत अनेक उच्च प्रशासकीय पदे आणि अध्यापनाची मानाची पदे त्यांनी भूषविली. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठांचे कुलगुरुपद ह्या कळसाच्या बहुमानाने त्यांच्या अध्ययन-अध्यापन-संशोधन आणि बहुविध साहित्यनिर्मितीचा, त्यांच्या सामाजिक आणि सांस्कृतिक भान असलेल्या समीक्षालेखनाचा गौरव झाला आहे. त्यामुळेच साहित्यप्रेमींनी त्यांना ८६ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावर विराजमान केले आहे. 'म.सा.प.' तर्फे त्यांचे अभिनंदन! (त्यांच्या आजपर्यंतच्या बहुआयामी यशस्वी कारकीर्दीचे सविस्तर प्रारूप पुढे दिले आहे.*

*संपादक, म.सा.पत्रिका, पुणे-३०*

**नाव :** **डॉ. नागनाथ लालुजीराव कोत्तापल्ले**

**पत्ता :** रो-हाऊस क्र. ०४, प्लॅनेट मिलेनियम, पिंपळे सौदागर, पुणे - २७ दूरध्वनी - ०२०-२७४०४१७२

**जन्म :** २९ मार्च १९४८, मुखेड जि. नांदेड

*** शिक्षण**

१९६९ – बी. ए. विद्यापीठात सर्व विषयांत तृतीय व मराठीत सर्वप्रथम. नांदापूरकर पारितोषिक

१९७१ – एम. ए. विद्यापीठात सर्वप्रथम कुलपतीचे सुवर्णपदक व कविवर्य मायदेव पारितोषिक

१९८० – "शंकर पाटील यांच्या समग्र साहित्याचा चिकित्सक अभ्यास" या विषयावर पीएच.डी. प्राप्त केली.

*** अध्यापनाचा अनुभव**

१९७१ ते १९७७ – या कालावधीत बीड येथील नवगण व श्री. बंकटस्वामी महाविद्यालयात अध्यापन

१९७७ ते १९९६ – डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात अधिव्याख्याता व प्रपाठक

१९९६ ते २००५ – पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्राध्यापक

*** प्रशासकीय अनुभव**

१९७१ ते १९७७ – महाविद्यालयात मराठी विभागप्रमुख

१९८८ ते १९९१ – संचालक, विद्यार्थी कल्याण, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद

१९९६ ते २००५ – मराठी विभागप्रमुख, पुणे विद्यापीठ, पुणे

२००३ ते २००५ – डॉ. बाबासाहेब आंबेडकर अध्यासन, पुणे विद्यापीठ (अधिकचा कार्यभार)

२००५ ते २०१० – कुलगुरू, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद

*** शासकीय स्तरावरील अनुभव**

२००२ ते २००५ – महाराष्ट्र सरकारच्या महाविद्यालय मूल्यांकन समितीचे सदस्य



अनुक्रमणिका








२००० ते २००५ – सदस्य, राज्य मराठी विकास संस्था
१९९८ ते २००३ – सदस्य, साहित्य अकादमी, सर्वसाधारण सभा, दिल्ली, सदस्य, साहित्य अकादमी, मराठी मंडळ, मुंबई
१९८८ ते १९८९ – अध्यक्ष, राज्य शासन साहित्य पुरस्कार समिती
१९८४ ते १९८५ – सदस्य, बालवाङ्मय पुरस्कार समिती – एन.सी.इ.आर.टी. दिल्ली.
१९८५ ते १९९७ – निमंत्रक, मराठी अभ्यास मंडळ, एस.एस.सी. बोर्ड, पुणे

*** विद्यापीठांशी संबंधित अनुभव**

१९८८ ते १९९१ – डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या अधिसभा, विद्यापरिषद, प्रौढ शिक्षण मंडळ व क्रीडा मंडळाचे सदस्य
१९८९ ते १९९० – सदस्य-सचिव, महात्मा फुले प्रतिष्ठान, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.
१९९४ ते १९९६ – सदस्य, महात्मा फुले प्रतिष्ठान, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
१९९७ ते २००१ – सदस्य, अधिसभा, पुणे विद्यापीठ, पुणे
१९९६ ते २००५ – पुणे विद्यापीठाच्या अनेक समित्यांवर काम केले.
१९९० ते १९९४ – स्वीकृत सदस्य, कला विद्याशाखा, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
१९९८ ते २००५ – अमरावती विद्यापीठ, पुणे विद्यापीठ, मुंबई विद्यापीठ व एस.एन.डी.टी. विद्यापीठांच्या "संशोधन व मान्यता" समितीचे सदस्य
१९९६ ते २००५ – पुणे विद्यापीठ, मुंबई विद्यापीठ, एस.एन.डी.टी. विद्यापीठ, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, गुलबर्गा विद्यापीठ, धारवाड विद्यापीठ, महाराजा सयाजीराव विद्यापीठ (बडोदा), बनारस हिंदू विद्यापीठ, भारती विद्यापीठ, विक्रम विद्यापीठ व डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे सदस्य
१९९७ ते २००१ – धुळे येथील का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन केंद्राच्या मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष

*** साहित्य संस्थांचे सदस्यत्व**

१९७७ ते १९८० – सदस्य, मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद
१९८८ ते १९९५ – कार्यकारी अध्यक्ष, मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद
२००१ ते २००५ – उपाध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
१९७७ ते १९८० व १९९५ ते १९९६ सदस्य, अ.भा. मराठी साहित्य महामंडळ
१९९७ ते २००५ – महाराष्ट्र फाऊंडेशन, कुसुमाग्रज प्रतिष्ठान या संस्थांवर काही काळ सदस्य

*** इतर संस्था** – सदस्य, मराठवाडा मित्र मंडळ, पुणे

*** संपादक**

१९७७ - १९८० व १९८८-१९९१ "प्रतिष्ठान" या वाङ्मयीन नियतकालिकाचे कार्यकारी संपादक.

*** सन्मान**

– १९८६ मध्ये मुंबई येथे झालेल्या दुसऱ्या युवा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
– १९९९ मध्ये श्रीगोंदा येथे झालेल्या ८ व्या ग्रामीण साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
– २००० चिकोत्रा खोरे साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
– २००१ उंडाळे (कऱ्हाड) येथे झालेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष



अनुक्रमणिका

– २००६ जालना येथे झालेल्या २७ व्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष
– २००७ वाळवा येथे झालेल्या ८ व्या बंधुता संमेलनाचे अध्यक्ष

*** पुरस्कार**

– "मुडस" (१९७६), "संदर्भ" (१९८४), "गांधारीचे डोळे" (१९८५), "ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि शोध" (१९८५) व "उद्याच्या सुंदर दिवसांसाठी" (२००२) या पुस्तकांना महाराष्ट्र राज्य शासनाचे पुरस्कार प्राप्त.
– "ज्योतिपर्व" या वैचारिक ग्रंथास महाराष्ट्र साहित्य परिषदेचा केशवराव विचारे पुरस्कार (२००२) प्राप्त.
– "रक्त आणि पाऊस" या कथासंग्रहास परिवर्तन, औरंगाबाद या संस्थेचा बी. रघुनाथ पुरस्कार (१९९५)
– "साहित्याचा अवकाश" या समीक्षा ग्रंथास वैराग येथील शिरीष गांधी पुरस्कार (२००४) प्राप्त.
– पी. के. अण्णा पाटील फाऊंडेशन शहादाचा रु. एक लाखाचा "पुरुषोत्तम पुरस्कार" कुलगुरू म्हणून व लेखक म्हणून केलेल्या कार्याबद्दल प्राप्त (२००८)
– यशवंतराव चव्हाण ट्रस्ट, अंबाजोगाईचा यशवंतराव चव्हाण पुरस्कार २००२
– बंधुता पुरस्कार २००८
– पुणे नगर वाचन मंदिर या संस्थेचा "न. चिं. केळकर पुरस्कार" २००९
– माहूर येथील महाकवी विष्णुदास पुरस्कार २००९
– नांदेड जि. प. चा नरहर कुरुंदकर पुरस्कार : २०१२
– वाई येथील रा. ना. चव्हाण प्रतिष्ठानचा कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे पुरस्कार : २०१२

*** संशोधन मार्गदर्शन**

१० विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी आणि २० विद्यार्थ्यांना एम.फिल.साठी मार्गदर्शन केले.

*** व्याख्यानमाला**

– महाराष्ट्राच्या विविध भागांत देशभरात विविध व्याख्यानमालांमधून व्याख्याने.
– वेगवेगळ्या साहित्य संमेलनांमधून वक्ते व अध्यक्ष म्हणून सहभाग.
– चर्चासत्रे परिषदा आणि कार्यशाळांमधून उद्घाटक, बीजभाषक, अध्यक्ष आणि निबंधलेखक म्हणून सहभाग.

*** परदेशगमन**

– ऑक्टोबर २००६ मध्ये मलेशिया-कौलंलांपूर येथे झालेल्या कुलगुरू परिषदेत सहभाग.
– सॅनहोजे-सनफ्रान्सिस्को येथे झालेल्या प्रथम मराठी विश्व साहित्य संमेलनात (फेब्रुवारी २००८) परिसंवादाचे अध्यक्ष म्हणून सहभाग.
– अमेरिकेतील येल, स्टॅनफोर्ड, कोलंबो, रॉकफेलर व कॅलिफोर्निया विद्यापीठांना भेटी व तेथील शैक्षणिक उपक्रमांबद्दल चर्चा

*** ग्रंथसंपदा**

– कविता संग्रह– मुडस १९७६
मुडस् आणि नंतरच्या कविता – २०१२

**– कथासंग्रह**

– कर्फ्यू आणि इतर कथा १९८०
– संदर्भ १९८४, दु. आ. २००९
– राजधानी प्र.आ. १९८८, दु. आ. १९९०, ति. आ. २०१२
– रक्त आणि पाऊस १९९२, दु. आ. २०१२



अनुक्रमणिका

- कवीची गोष्ट १९९३
- देवाचे डोळे १९९५, दु. आ. २०००, ति. आ. २०१५
- सावित्रीचा निर्णय २०००
- कादंबरी
- मध्यरात्र प्र. आ. १९८५, द्वि. आ. १९९८
- गांधारीचे डोळे १९८५, दु. आ. २०१२
- पराभव १९८७, दु. आ. २००९
- **समीक्षा**
- पापुद्रे १९७८
- ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि शोध १९८५, १९९२, २००९, २०११
- नवकथाकार शंकर पाटील १९८६, २००२
- साहित्याचा अन्वयार्थ १९९६, २००९ ति. आ. २०१०
- साहित्याचा अवकाश २००३
- मराठी कविता : एक दृष्टिक्षेप १९९९, २००४, ति. आ. २००८

*** अन्य**

- गावात फुलले चांदणे (प्रौढ साक्षरांसाठी कादंबरी) १९७८
- कोमेजलेला चंद्र (असामी कादंबरीचा अनुवाद – NBT) १९८५
- उद्याच्या सुंदर दिवसांसाठी (ललित गद्य) २००३, २०१२
- ज्योतिपर्व (वैचारिक) – २००२, २००५, २००८
- सत्यधर्मी ज्योतिबा फुले (विद्यार्थ्यांसाठी) – २००३

*** संपादने**

- अपार्थिवाचे गाणे (सहकार्याने) १९७८
- स्त्रीपुरुष तुलना १९९०, १९९३, २०१०
- पाचोळा आणि दहा समीक्षक १९८८
- निवडक बी. रघुनाथ १९९५
- शेतकऱ्याचा आसूड २००१, २००४, २००६, २०१०, २०११

* डॉ. कोत्तापल्ले यांच्या साहित्याचे इतर भाषेत झालेले अनुवाद

१. 'अहस्तांतरणीय', 'जनावरे', 'वारसा', या कथांचा व 'गांधारीचे डोळे' या कादंबरीचा हिंदीत अनुवाद 'ज्योतिपर्व' या ग्रंथाचा हिंदीमध्ये अनुवाद.
२. 'वारसा' या कथेचा उर्दूत अनुवाद
३. 'राजधानी' या कथासंग्रहाचा इंग्रजीत अनुवाद

*** लेखक म्हणून मान्यता**

- पुणे विद्यापीठ, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद, अमरावती विद्यापीठ, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ या विद्यापीठांतून डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या साहित्यावर पीएच.डी. व एम.फिल्. साठी संशोधन झालेले आहे, होत आहे.
- लेखक म्हणून महत्त्वाच्या नियतकालिकांनी मुलाखती प्रसिद्ध केल्या आहेत.

संपादकीय



# शंभर वर्षांच्या इतिहासाची साक्षीदार : महाराष्ट्र साहित्य पत्रिका

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला १२ ऑगस्ट २०१२ रोजी शंभर वर्षे पूर्ण झाली आहेत. कोणत्याही कार्याला-जीवनकार्याला शंभर वर्षे पूर्ण होणे, ही एका अर्थाने सार्थक जीवनाचे लक्षण मानले जाते. भारतीय संस्कृतीत कोणत्याही कार्याला आशीर्वादाची अपेक्षा करताना –

*'....पश्येम शरद: शतम् जीवेम शरद: शतम्, शृणुयाम शरद: शतम् ।*

*प्र ब्रवाम शरद: शतमदीना: स्याम् शरद: शतं, भूयश्च शरद: शतात् ॥'* (शुक्ल यजु. अ. ३६ मं २४)

'सूर्य हा सर्व विश्वाचा चक्षु. तो चराचराला प्रकाशित करणारा सत्यसूर्य – खऱ्या अर्थाने ज्ञानसूर्य – त्याला आम्ही शंभर वर्षे पाहू. आम्ही शंभर वर्षे मानवी कल्याणाच्या उदात्त विचारांचे शंभर वर्षे श्रवण करू. शंभर वर्षे मानवी कल्याणाचीच स्तोत्रे गाऊ. शंभर वर्षे, आणि सामर्थ्यशाली; दैन्यहीन जीवन जगू. इतकेच नव्हे तर त्याहीपेक्षा अधिक काळ जगू.'

असे विश्वकल्याणाचे गाणे गात जीवन जगताना 'आम्ही समान आहोत. आमचे मन समान आहे. आमचे हृदय समान आहे. सर्व विश्वाच्या कल्याणार्थ आमची एकच मानव गौरवाची प्रार्थना असावी. अशा एकमताने आमचे शंभर वर्षाचे जीवन आम्ही व्यतीत करावे असे पूर्वसूरींनी सांगितले. ते शब्द असे–

*'ॐ समानी व: आकूति: समाना हृदयानि व: ।*
*समानमस्तु वो मनो यथा व: सुसहासति ॥'*

*(ऋ. १०, १९१.४)*

एवढेच काय, पण आज वादग्रस्त असलेल्या मनुस्मृतीतही अखिल मानवाच्या कल्याणाची व समृद्ध जीवनाचीच प्रार्थना केली आहे. ती अशी –

*'दातारो नोऽभिवर्धन्तां वेदा: संततिरेव न: ।*
*श्रद्धा च नो मा व्यगमद् बहु देयं च नोस्त्विति ॥*
*अन्नं च नो बहु भवेदतिर्थीइच लभेमहि ।*
*याचितारश्च न: सन्तु मा च याचिष्म कंचन ॥*

*(मनुस्मृति : ३.२५९)*

याचा अर्थ – ... आम्हाला दान देणारे समृद्ध होवोत. आमचे ज्ञान, प्रजा आणि त्यांची जीवनश्रद्धा वर्धिष्णु-अभंग असावी. आम्हाला अन्न (धन-धान्याची) समृद्धी असावी. आमच्याकडे याचक-अतिथी-पुष्कळ यावेत. अनेकांना दान देण्याचे आम्हाला सामर्थ्य लाभावे; परंतु आमच्यावर मात्र याचना करण्याची वेळ येऊ नये...' असे शंभर वर्षांचे किंवा त्या अधिकही 'विनादैन्येन' जीवन जगावे; हीच जीवननिष्ठा!

असे समृद्ध जीवन जगताना, आम्ही प्रकाशाबरोबर अंधार, ज्ञानाबरोबर अज्ञान, समृद्धीबरोबर दैन्य-दारिद्र्य, सौंदर्याबरोबर कुरूपता इ. विरोधी गोष्टींनाही कमी लेखणार नाही. त्यांनाही शंभर वर्षांच्या परिपूर्ण जीवनश्रद्धेत आमच्याबरोबर समानत्वाने घ्यावे. आम्ही कुणाचाही द्वेष करणार नाही. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे हेच घोषवाक्य होते. त्याचे परत एकदा स्मरण करणे आवश्यक आहे.

*'...तेजस्वि नौ अधीतं अस्तु । मा विद्विषावहै... ॥'*

'... आमचे अध्ययन-अध्यापन तेजस्वी राहो. आम्ही कुणाचाही द्वेष-तिरस्कार करू नये...'

कोणत्याही ज्ञान-शाखेचा, विचारांचा तिरस्कार न करता त्यांना बरोबर घेऊन, ते आत्मसात करून त्यांना जीवन सुखमय करण्यासाठी, कोणत्याही एकाच विचारांच्या दावणीस न बांधता ते स्वयंपूर्ण होऊन अधिकाधिक तेजस्वी कसे होईल; हाच अध्ययन-अध्यापनाचा ध्यास असला पाहिजे. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेने हे विचारस्वातंत्र्य गेल्या शंभर वर्षांत जपले आहे. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक-राजकीय-सामाजिक-सर्वधार्मिक व आर्थिक विचारांचीही दखल घेतलेली आहे. त्याचा आढावा घेण्याचे काम या शताब्दीपूर्तीच्या काळात साहित्य पत्रिकेच्या माध्यमातून होणार आहे.







अनुक्रमणिका

**साहित्यपत्रिकेची जन्मकथा – पुन:स्मरण.**

मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांचे ऐक्य करण्याच्या प्रमुख उद्देशाने दि. २७ मे १९०६ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषदेची स्थापना झाल्याची घोषणा १० जुलै १९०६ च्या 'केसरी'मध्ये वासुदेव गोविंद आपटे, विनायक लक्ष्मण भावे आणि कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांच्या सह्यांच्या निवेदनाने जाहीर झाली. तथापि, परिषदेला नियमनियमावली करून तिला घटनेनुसार सुसंघटित करण्याचे कार्य म्हणून इ. स. १९१२ साली महाराष्ट्र साहित्य परिषदेची घटना-नियमावली अकोले येथील संमेलनात मंजूर झाली. त्यापूर्वी बडोदे येथील १९०९ साली भरलेल्या संमेलनात परिषदेच्या घटनेचा मसुदा तयार झाला होता. मराठी भाषेच्या वृद्धीसाठी आणि मराठी भाषेतील प्रसिद्ध-अप्रसिद्ध ग्रंथांचा संग्रह करणे. केवळ ग्रंथसंग्रह न करता, मराठी ग्रंथांचे परीक्षण करणे. साहित्यचर्चा करणे इ. साठी एखादे मासिक किंवा त्रैमासिक काढणे, असे धोरण आखले होते. अकोल्याच्या संमेलनात या ध्येयधोरणावर शिक्कामोर्तब झाल्यानंतर दि. ९ मार्च १९१३ रोजी मुंबई येथील गिरगावात साहित्यपरिषदेचे एक संस्थापक विश्वस्त डॉ. (सर) भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांच्या दिवाणखान्यात, त्यांच्याच अध्यक्षतेखाली जी पहिली सभा भरली होती; त्या बैठकीच्या विषयपत्रिकेवर 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' म्हणून एक लहानसे मासिक काढावे. आज अस्तित्वात असलेल्या एखाद्या भारदस्त मासिकाला जोडूनच ही पत्रिका सुमारे ६ पासून १२ पृष्ठांची (रॉयल ऑक्टेव्हो आकारात) काढावी व समग्र मासिक परिषदेच्या सभासदांस माफक सवलतीने दिले जाण्याची व्यवस्था करावी; आणि त्याबद्दल त्या मासिकाचे संपादकास काही मोबदला देण्याची व्यवस्था करावी. (परंतु आतापर्यंत विद्यमान संपादकासह कोणत्याही संपादकाने मोबदला घेतलेला नाही.) सदरहू पत्रिकेत विद्वान लेखकांकडून लिहिलेले परीक्षण-लेख आणि त्याचप्रमाणे उपयुक्त विषयांवर वळण लावण्यासारखे लेख, प्रसंगी पारितोषिक देऊन घालण्यात यावेत. तसेच साहित्यवृत्तही द्यावे अशी चर्चा झाली. या चर्चेनुसार बारा पृष्ठांची 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' 'विविधज्ञान-विस्तार' मासिकास जोडून येत्या जुलैपासून काढावी असे ठरले होते; परंतु प्रत्यक्षात 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा पहिला अंक ऑगस्ट १९१३ मध्ये विविधज्ञान-विस्ताराची पुरवणी म्हणून प्रसिद्ध झाला. विविधज्ञान विस्तार पुरवणीसहची वार्षिक वगर्णी रु. ३/- तीन फक्त होती. परंतु परिषदेच्या सभासदांसाठी तीनऐवजी रु. २॥/- अडीच मात्र ठरविण्यात आली होती. केवळ 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' ही पुरवणी घेणाऱ्याला रु.१/- एक फक्त वार्षिक वर्गणी होती. १९१३ ते १९२५ अखेरपर्यंत पत्रिकेचे सतरा अंक, 'वि. ज्ञा. विस्ताराचे शेपूट' म्हणून प्रसिद्ध झालेली साहित्य पत्रिका, अनेक अडचणींवर मात करून (दि. १३/१०/१९२७ च्या वार्षिक साधारण सभेतील ठरावानुसार) महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र म्हणून परिषदेमार्फत स्वतंत्रपणे **'मराठी साहित्य पत्रिका'** म्हणून पहिले दोन अंक आणि नंतर **'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'** या नावाने प्रसिद्ध होऊ लागली. स्वत:च्या पायावरील पहिला अंक – चैत्र शुद्ध प्रतिपदा शके १८५०, ता. २२ मार्च १९२८ अशा दुहेरी काळाचा उल्लेख करून प्रकाशित झाला. 'पुणे येथील आर्यसंस्कृती मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रोड येथे डॉ. वासुदेव गोपाळ परांजपे यांनी छापले व हे पुस्तक मुंबई येथे मराठी साहित्य परिषदेच्या कचेरीत (भाई जीवनजी गल्ली, मुंबई नं. २) परिषदेतर्फे रा. ना. गो. चापेकर यांनी प्रसिद्ध केले.' असा उल्लेख पत्रिकेवर आहे.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका स्वतंत्रपणे, वि. ज्ञा. विस्ताराचा आधार न घेता, प्रकाशित करण्याचे 'स्वप्न' प्रत्यक्षात आले ते २२ मार्च १९२८ रोजी! पत्रिकेचा पहिला अंक, विविधज्ञान विस्ताराच्या आधाराने का होईना, ऑगस्ट १९१३ मध्ये प्रसिद्ध झाला. ह्या इ.सनाप्रमाणे महाराष्ट्र साहित्य पत्रिका शंभर वर्षांची झाली आहे. प्रारंभीच्या काळात ती काही काळ आजारी होती; परंतु त्यामुळे जन्मदिनांक/जन्मतिथी बदलता येत नाही. मूल रांगणे, आधाराने चालावयास लागणे, आधाराविना चालणे अशा स्वाभाविक विकासाच्या अवस्था असतातच म्हणून जन्मतारीख बदलत नाही. फार तर आपण असे म्हणू की, पत्रिका १२ वर्षांच्या परावलंबित्वानंतर ऑगस्ट १९२८ पासून स्वावलंबनाने प्रकाशित झाल्याला ८६ वर्षे पूर्ण झाली; आणि

जन्मतारखेने शंभर वर्षांची झाली. ऑगस्ट २०१३ ला १०१ वा अंक महोत्सवी स्वरूपात प्रकाशित होणार आहे. वाङ्मयीन नियतकालिकाच्या इतिहासात याला अनन्यसाधारण महत्त्व आहे.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका – शंभर वर्षाच्या इतिहासाची साक्षीदार आहे. तिने बहुविध स्थित्यंतरे पाहिली. बहुविध इतिहास पहिला, त्याचे पडसाद साहित्य पत्रिकेत उतरले. जहाल-मवाळांचे विचार, सरकारची अवकृपा होणार नाही अशी प्रारंभीची सावध राष्ट्रभक्ती, उघड सुधारणावाद, प्राचीन मराठी साहित्य आणि साहित्याचे नवे प्रवाह, विविध वाङ्मयीन वादविवाद, दुसऱ्या महायुद्धाची छाया, त्याचे सामाजिक-राजकीय पडसाद, कर्नाटक राज्यातील मराठीची अवस्था, तत्कालीन ज्वलंत विषय – स्त्रीशिक्षण, राष्ट्रभाषा कोणती असावी, नभोवाणीवरील मराठीची हेळसांड, प्रांतिक सरकारांच्या स्थापनेत महाराष्ट्राची होणारी गळचेपी, संयुक्त महाराष्ट्राचे मूलभूत सूत्र, हिंदू-मुस्लिम ऐक्यसंवर्धन होईल असा ग्रंथ होण्याबाबत, पंचम जॉर्ज बादशहाच्या अभिनंदनाबाबत इ. विषयांपासून ते आणीबाणीच्या काळातील अभिव्यक्ती स्वातंत्र्यावर, ज्येष्ठ साहित्यिकांची प्रतिक्रियात्मक भाषणेही, संकलित केली आहेत.

## सुवर्णमध्य साधणारा मध्यमवर्ग

अव्वल इंग्रजी दर्जाच्या काळात प्रारंभीच्या सुशिक्षितांच्या पिढीत तीन सामाजिक विचारप्रवाह दिसून येतात. इंग्रजी शिक्षणाने आपल्या देशाचे वैचारिक मागासलेपणा लक्षात आल्याने, सामाजिक सुधारणाची कास धरणाऱ्या – सामाजिक सुधारणावाद्यांचा वर्ग – ज्यात सुधारकाग्रणी गो. ग. आगरकर, महात्मा फुले, राजर्षी शाहू महाराज, नामदार गोखले, महर्षी कर्वे, र. धों. कर्वे, न्या. रानडे आणि त्यांचे अनुयायी होते. दुसरा प्रवाह, राजकीय सुधारणांना प्राधान्य देणारे विचारवंत – त्यात लोकमान्य टिळक आणि टिळकयुग, म. गांधी आणि गांधीयुग! ह्या दोघांच्याही विचारांची पूर्ण जाणीव असलेला आणि सरकार-दरबारी नोकरीत रावसाहेब, रावबहादूर इ. पदव्यांनी सन्मानित झालेला – सुरक्षित जीवन जगणारा चाकरमान्या तिसरा मध्यमवर्गीय सुशिक्षित वर्ग – जो वर्ग काव्यशास्त्रविनोद जगणारा, इंग्रजी साहित्याने प्रभावित झालेला वर्ग होता. ज्यांनी प्राचीन मराठी साहित्य–इतिहास भाषासंवर्धन, कलासंवर्धन इ. संस्कृतीसंवर्धनाच्या कार्यात रस घेतला. राजाश्रयाने सांस्कृतिक संवर्धन करण्यावर त्यांचा विश्वास होता. त्यांनी राजकीय सुधारणावादी आणि सामाजिक सुधारणावादी दोन्हीही विचारांचा स्वीकार केला, आणि राज्यकर्त्यांची व एतदेशीयांची गैरमर्जी होणार नाही अशा पद्धतीने; साहित्य, विविधकला व संस्कृतीसंवर्धनाची चळवळ जागती ठेवली. सुवर्णमध्य साधणाऱ्या मध्यमवर्गीयांना राजकीय आणि सामाजिक चळवळींमधील अग्रणींचाही आशीर्वाद होताच. मध्यमवर्गामुळेच मराठी साहित्यात 'भाषांतरयुग' अवतरले. पाश्चात्य ग्रंथांची, विविध धर्मीयांची ग्रंथसंपत्ती प्रादेशिक भाषांमध्ये आली. महाराष्ट्र साहित्य परिषद ही अशीच वैचारिक सुवर्णमध्य साधणारी साहित्यसंस्था होती व आहे. महाराष्ट्र साहित्य पत्रिका हे तिचे त्रैमासिक मुखपत्र गेली शंभर वर्षे देशातील सर्व विचारांना-वैचारिक चळवळींना, सामावून घेत प्रकाशित होत आली आहे.

साहित्यपत्रिका जेव्हा स्थापित झाली; त्यावेळी विविधज्ञान विस्ताराच्या आधारे, एका अर्थाने, परावलंबित्व स्वीकारलेली साहित्यपत्रिका, स्वत:च्या पायावर कधीकाळी उभी राहील कां? असा प्रश्न रावसाहेब मोरमकर, वा. गो. आपटे, पाध्ये इ. कार्यकर्त्यांना पडला होता. २२ मार्च १९२८ साली स्वत:च्या पायावर ती उभी राहिली! आता शंभर वर्षांच्या विचारजागृतीची ती साक्षीदार झाली आहे.

*(क्रमश:)*

संपादक

संपर्क : ७ 'सूर', गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५
भ्रमणभाष : ९७६७६९९३१९

महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०, फोन-९७६७६९९३१९
दूरभाष : ०२४१/२४२९७५५



(द्विजन्मशताब्दी)

# पत्रकारितेचे जनक : आचार्य बाळशास्त्री जांभेकर

– रविंद्र बेडकिहाळ

*मराठी वृत्तपत्रसृष्टीचे जनक 'दर्पण'कार आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांची द्विजन्मशताब्दी दि. २० फेब्रुवारी २०१२ पासून सुरू होत आहे. महाराष्ट्राच्या सामाजिक प्रबोधनाच्या इतिहासात त्यांचा 'महाराष्ट्राचे सामाजिक सुधारक' असा अग्रणी उल्लेख केला जातो. त्यांच्या चरित्रकार्याचा द्विजन्मशताब्दीनिमित्त हा संक्षिप्त आढावा घेतलाय पत्रकार रवींद्र बेडकिहाळ यांनी. मराठी भाषेचे पहिले नियतकालिक 'दर्पण' १८३२ मध्ये बाळशास्त्री जांभेकरांनी सुरू करून मराठीतील ज्ञानपत्राचा प्रारंभ केला. स्वदेशीय लोकांमध्ये विलायतेतील विद्यांचा अभ्यास अधिक व्हावा आणि या देशाची समृद्धी व येथील लोकांचे कल्याण यांविषयी स्वतंत्रतेने उघड विचार करावयास स्थल व्हावे, ह्या उद्देशाने हे नियतकालिक निघाल्याचा उल्लेख आहे. शुद्ध मनोरंजन हाही 'दर्पण'चा उद्देश होता. याप्रमाणे ज्ञानरंजन ह्या दुहेरी हेतूचा पाया 'दर्पण'ने घातला. त्या पहिल्या ज्ञानसेवकाचा हा परिचय.* – *संपादक*

"एल्फिस्टन नेटिव एज्युकेशन इन्स्टिट्यूशनचे परलोकवासी शिक्षागुरू बाळगंगाधर शास्त्री जे अखंड हिंदुस्थानातील एतद्देशियांमध्ये सर्वांत मोठे विद्वान होते. असे सर्वजण कबूल करतील की ज्यांच्या बरोबरीचा विद्वान असा एकही एतद्देशीय पुरुष हिंदुस्थानात नव्हता आणि जो युरोपीयन लोकातील नामांकितांपैकी नामांकित विद्वानाहून कदाचित सरस नसला, तरी त्यांच्या बरोबरीचा खास होता. जो इंग्रजी प्रमाणित संस्कृतातील चौदा विद्यांत पूर्ण प्रवीण असून फार्सी, अरबी, गुजराथी इत्यादी भाषांत व एशिया खंडातील अन्य भाषांत नामांकित शिक्षागुरू होता. त्याची विद्वत्ता, नीतिमत्ता वाखाणण्याजोगी होती आणि ज्याच्या मरणाचे इतरांनाच काय, पण मुंबईच्या सुप्रीम कोर्टातील न्यायमूर्ती ना. सर अर्स्किन पेरी यांनाही मोठे दु:ख होऊन त्यांनी ग्रँड ज्यूरीतील व बाल्कनीमधील लोकांपुढे मोठ्या गहिवराने व कष्टाने समजावून सांगितले की, ज्या पुरुषाने एतद्देशियांच्या हजारो मुलांना उत्तम उत्तम विद्या व वाखाणण्याजोगी नीतिमत्ता शिकवली, ज्याने अनेक प्रसिद्ध इंग्रजी पुस्तकांची देशी भाषेत रूपांतरे केली. ज्याने विद्यादानार्थ पुष्कळ सभा केल्या; आणि ज्याने एतद्देशियांच्या मुलांनी शेकडो वर्षांपर्यंत सुखी व्हावे म्हणून त्यांना अज्ञानांधकारातून उजेडात आणिले, त्या नामांकित व महाविद्वान गृहस्थाची स्मृती आपण एतद्देशियांनी हरएक प्रकारे राखावी, हे उचित आहे."



(तत्कालीन वृत्तपत्र 'मुंबईचा चाबुक' १६ जुलै १८४६ मधील बाळगंगाधर शास्त्री यांच्यावरील लेखातील परिच्छेद)

(संदर्भ - कै. ग. गं. जांभेकर यांच्या तिसऱ्या खंडातील पृष्ठ क्र. ५१ वरून)

**बाळशास्त्रींचा जन्म व बालपण**

बाळशास्त्री जांभेकर यांचा जन्म २० फेब्रुवारी १८१२ रोजी पोंभुर्ले, ता. देवगड, जि. सिंधुदुर्ग येथे झाला. (असे अनेक संशोधकांच्या उपलब्ध नोंदीवरून दिसून येते.) सुरुवातीचे शिक्षण पोंभुर्ले येथे घरीच झाले. वडील गंगाधरशास्त्री व मातोश्री सौ. सगुणाबाई यांसारख्या धार्मिक व सदाचार संपन्न

पुराणिकांच्या सान्निध्यात त्यांचे शिक्षण झाले. त्यामुळे मराठी लेखन, वाचन, व्यावहारिक गणित, तोंडी हिशेब, रामदास-तुकाराम इत्यादी चरित्र, वामन, मोरोपंत प्रसिद्ध कवींच्या कविता व अमरकोश पंचमहाकाव्यांमध्ये ते आठव्या वर्षी पारंगत झाले.

### सामाजिक घडामोडी, बाळशास्त्री जांभेकरांचे शिक्षण व शैक्षणिक कार्य

बाळशास्त्री जांभेकर वयाच्या १२ व्या वर्षी मुंबईमध्ये पुढील शिक्षणासाठी आले. एल्फिन्स्टन यांनी २१ ऑगस्ट १८२२ रोजी मुंबई येथे 'दि बॉम्बे नेटिव्ह स्कूल, बुक अँड स्कूल सोसायटी' नावाची शिक्षण संस्था काढली. या संस्थेच्याच शाळेत बाळशास्त्रींनी प्रवेश घेतला. अल्पवयी बाळा अत्यंत बुद्धिमान, व्यासंगी असल्याने सर्व विद्यार्थ्यांमध्ये तो अग्रगण्य होता व शिक्षकांचा आवडताही झाला. बाळशास्त्रींचा मुंबईला प्रयाण होण्याआधीचा काळ, म्हणजे १८१८ चा काळ. हा पेशवाईच्या अस्ताचा होता. पेशवाई अस्ताला गेल्याने मुंबई इलाख्यामधील हा काळ अत्यंत धामधुमीचा होता. मुंबई इलाख्याची सर्व प्रशासकीय सूत्रे पहिला ब्रिटिश गव्हर्नर माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन याच्याकडे आली होती. हा गव्हर्नर आपल्या दूरदर्शीपणाबद्दल प्रसिद्ध होता. स्वत:च्या धोरणाने ब्रिटिशांचे राज्य वाढावे, आपल्या प्रजेचेही हित व्हावे याबद्दल दक्ष होता. पेशवाईच्या अस्तामुळे पुण्यातील अनेक बुद्धिवंत, विद्वान तरुण मुंबईकडे प्रयाण करू लागले. इंग्रजांनी आणलेले ज्ञान-विज्ञान, त्यांनी केलेला शिक्षणप्रसार ही एक प्रकारे देणगी जरी असली तरी तरुणांमध्ये निर्माण झालेली इंग्रजानुकूल वृत्ती व स्वदेश हितविषयीची एक प्रकारची उदासीनता, हा अतिशय चिंतेचा भाग होता. शिक्षणाशिवाय, विशेषत: पाश्चात्त्य देशातील आधुनिक ज्ञानाशिवाय तरणोपाय नाही, ही बाळशास्त्रींची भूमिका होती. इंग्रज देत असलेले शिक्षण हे खरे ज्ञान नसून केवळ कंपनी सरकारला आपली कंपनी चालविण्याकरिता कारकून हवे आहेत, हेसुद्धा बाळशास्त्रींनी ओळखले होते. १८२७ मध्ये गव्हर्नर लॉर्ड माऊंड स्टुअर्ट एल्फिन्स्टन सेवानिवृत्त होऊन विलायतेला परत गेल्यानंतर त्यांच्या स्मरणार्थ मुंबई शिक्षण मंडळी यांनी, त्यांच्या नावाने एल्फिन्स्टन स्कूल सुरू केले. प्रौढ विद्यार्थ्यांना पाश्चात्त्यशास्त्रे आणि वाङ्मय यांचे शिक्षण देण्याकरिता विलायतेतून प्राध्यापक मागविले होते. त्यांच्यासमवेत त्यांना 'असिस्टंट प्रोफेसर' म्हणून दोन हुशार सहाय्यकाची आवश्यकता होती. त्या वेळी जांभेकरांचा नावलौकिक विलायतेत पोहोचला होता. बाळशास्त्री जांभेकर मुळातच हुशार व कुशाग्र बुद्धिमत्तेचे असल्याने त्यांची नोव्हेंबर १८३४ मध्ये पहिले 'असिस्टंट प्रोफेसर' म्हणून नेमणूक करण्यात आली. अशी नेमणूक होण्याचा पहिला मान मिळविणारे ते पहिले भारतीय ठरले.

बाळशास्त्रींनी तीन वर्षे अध्यापनात स्वत:चे अप्रतिम कौशल्य दाखविले. पाश्चात्त्य विद्या, गणित, ज्योतिषशास्त्र यात त्यांनी प्रावीण्य मिळविले. पुढे याच संस्थेने मुंबईतच स्वतंत्र ज्युनिअर स्कूल सुरू केले व बाळशास्त्रींनाच त्याचे प्रमुख नेमले.

याआधी बाळशास्त्री जांभेकरांनी बुद्धिचातुर्याच्या जोरावर दि बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचे सन १८३० मध्ये डेप्युटी नेटिव्ह सेक्रेटरी म्हणून, तर पुढे सन १८३२ पासून पूर्णवेळ नेटिव्ह सेक्रेटरी म्हणून काम पाहिले. त्या काळात हा मान किंवा हे पद फक्त युरोपियन, पार्शी, मुसलमान यांनाच मिळत असे.

याच काळात मुंबईबाहेर सरकारी इंग्रजी व मराठी शाळा फार थोड्या होत्या. सन १८४४ पर्यंत पुणे, ठाणे, सुरत या तीन ठिकाणीच इंग्रजी शाळा होत्या. प्रत्येक विभागात जेमतेम ४०-५० प्राथमिक शाळा होत्या. सरकारचे शिक्षण खाते १८५५ मध्ये अस्तित्वात आले. तत्पूर्वी १८४४ ते १८५५ या काळात बोर्ड ऑफ एज्युकेशन ही निमसरकारी संस्थाच प्रशासनाचे काम पाहत होती. उपरोक्त प्रत्येक विभागासाठी मुख्य शाळा तपासनीस ज्यांना सुपरिंडेटेंड संबोधित असत असे नेमण्यात आले. या पदावर बाळशास्त्री जांभेकर यांनीही दक्षिण विभागातील मराठी व कानडी शाळा तपासणीचे काम, वाहतुकीचे साधने उपलब्ध





अनुक्रमणिका

नसतानादेखील चार वर्षे केले म्हणूनच ते पहिले मराठी शिक्षणाधिकारी होत.

'बोर्ड ऑफ एज्युकेशन'ने चांगले प्रशिक्षित अध्यापक तयार करावेत, अशी बाळशास्त्रींची कल्पना होती. युरोपियन अधिकाऱ्यांनी ही कल्पना स्वीकारली आणि आचार्य बाळशास्त्रींच्या शिफारसीने १८४५ मध्ये 'अध्यापक वर्ग' (डी.एड., बी.एड. कॉलेज) सुरू केले; त्याचे पहिले संचालक म्हणून आचार्यांनीच काम पाहिले.

मुंबईसारख्या दाट वस्तीत मोहनगरीत शिक्षणासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन मिळावे, त्यांचे शीलसंवर्धन व्हावे या उद्देशाने आचार्यांनी मुंबईतच आपल्या घराशेजारी एक वाडा भाड्याने घेऊन पहिले विद्यार्थी वसतिगृह सुरू केले. तिथे ते विद्यार्थ्यांच्या शिस्त, आरोग्य, संस्कार व शिक्षण याकडे जातीने लक्ष देत.

### मराठीतील पहिल्या 'दर्पण' या वृत्तपत्राची सुरवात

"स्वदेशीय लोकांमध्ये विलायतेतील विद्यांचा अभ्यास अधिक व्हावा; आणि या देशाची समृद्धी, येथील लोकांचे कल्याण याविषयी स्वतंत्रपणे व उघडरीतीने विचार करावयास स्थल व्हावे..."

'दर्पण' प्रकाशित करण्यामागील आपली ही भूमिका बाळशास्त्री यांनी १२ नोव्हेंबर १८३१ रोजी प्रॉस्पेक्ट किंवा प्रस्ताव या नावाने वरीलप्रमाणे प्रकाशित केली प्रत्यक्षात 'दर्पणचा' पहिला अंक दिनांक ६ जानेवारी १८३२ रोजी प्रसिद्ध झाला. त्यात त्यांनी संपादकीयमध्ये आपले धोरण मांडले ते खालीलप्रमाणे -

"मनोरंजन करणे, चालते काळाची वर्तमाने कळविणे आणि योग्य तेच येण्याचे मार्ग दाखविणे, या गोष्टींचा दर्पण छापणाऱ्यांस मोठी उत्कंठा आहे. म्हणून या गोष्टी साध्य होण्यासाठी जितका प्रयत्न करवेल तितका ते करतील, कोण एकाच पक्षपात किंवा नीचपणा या दोषांचा मळ दर्पणास लागणार नाही. कारण की 'दर्पण' छापणाऱ्यांचे लक्ष्य निष्कृत्रिम आहे. म्हणून हे वर्तमानपत्र ज्या रीतीने भले आणि गुणी पुरुषास मान्य होईल; त्या रीतीने करण्यास ते दृढ निश्चयाने उद्योग करतील."

वरील पत्रकारितेचे धोरण आजच्या पत्रकारितेसही मार्गदर्शक असेच आहे. दर्पण वृत्तपत्र सुरू झाले तेव्हा ब्रिटिशांचे शासन होते आणि वृत्तपत्र नियंत्रण कडक होते. १८३५ नंतर हे नियंत्रण थोडे शिथिल झाले. त्या वेळी साक्षर वर्ग कमी होता. त्यामुळे वाचकांची संख्याही कमी होती. तरीही 'दर्पण'चे त्या काळात ३०० वर्गणीदार होते. त्या काळात ब्रिटिशांच्या नोकरीत असूनसुद्धा बाळशास्त्रींनी सरकारला रुचो वा न रुचो, नि:स्पृहपणे विविध सामाजिक विषयांवर 'दर्पण'मधून लेख, अग्रलेख लिहिले, ते आजही मार्गदर्शक ठरावेत, अशा दूरदृष्टीचे आहेत. दर्पणचा २६ जून १८४० रोजी शेवटचा अंक प्रसिद्ध झाला व ते बंद करण्यात आले. दरम्यान बाळशास्त्रींनी 'दर्पण' बंद होण्यापूर्वी 'दिग्दर्शन' नावाचे मासिक काढण्याचा संकल्प जाहीर केला होता. या मासिकाचा पहिला अंक १ मे १८४० रोजी प्रसिद्ध झाला. म्हणजे मराठी वृत्तपत्राप्रमाणे पहिल्या मराठी मासिकाचे जनकही बाळशास्त्री जांभेकर होते. मासिकासंबंधी जे माहितीपत्रक प्रसिद्ध करण्यात आले. त्यावरून त्याचा उद्देश, बातमीचे सार, भूगोल- इतिहास, पदार्थ विज्ञान, रसायनशास्त्र इत्यादींचे ज्ञान सर्वसामान्यांपर्यंत पोहोचविणे, हा होता. हे मासिक ४ वर्षे चालले.

### 'दर्पण' आणि सामाजिक सुधारणा

बाळशास्त्री उच्चविद्याविभूषित होते, आणि त्यांच्या शिक्षणाचा मूळ पिंड वैचारिक होता. त्या काळातील हिंदू धर्मकांडाचा त्यांनी बारकाईने अभ्यास केला होता. त्यामुळे काही कर्मठ कर्मकांडाविरुद्ध त्यांनी आवाज उठवला; तेव्हा त्यांना स्वकीयांशीच संघर्ष स्वीकारावा लागला.

समाजाच्या जीवन-मरणाशी निगडीत असलेल्या प्रश्नांची चिकित्सा करायला त्यांनी सुरुवात केली. ज्या विद्येचे संस्कार आजपर्यंत झाले ती विद्या सदोष आहे काय, घाण्याच्या बैलाला बांधलेल्या झापडासारखी एकमार्गी आहे काय, सनातन पुराण धर्मातील एकांतिक संन्यास प्रवृत्ती, अंधगुरू भक्ती, कर्मठ कर्मकांडे, चातुर्वर्ण्य, जन्मनिष्ठ उच्चनीचता, जातिभेद, धर्माचा अतिरेक इत्यादी

बाबत विचारमंथन सुरू करायला 'दर्पण'ची त्या काळात भूमिका होती; आणि ती निश्चितपणे धाडसाची होती. वरील सर्व विचार, स्त्रियांवर लादलेली बंधने, बालविवाह, विधवा विवाह, विधवांना पारतंत्र्य, केशवपन यांसारख्या गोष्टींमुळे आपली समाजरचना चुकीच्या पायांवर उभी आहे. यातील दोष काढले नाही तर पिढ्यान् पिढ्या हे सर्वांना भोगावे लागेल. यातून समाजाचा, धर्माचा, राष्ट्राचा विकास तर होणारच नाही; पण या शृंखलामुळे अवनतीच होणार आहे; आणि त्याला पारतंत्र्यांचे गुलामीचेच कायमस्वरूप येणार, हे जांभेकरांनी 'दर्पण'मधून सांगितले. नवयुगाची निर्मिती करायची असेल तर भौतिक दृष्टिकोन, भौतिक विद्यांचे अध्ययन स्वीकारले पाहिजे. आपल्या पौर्वात्य शिक्षण संस्कृतीबद्दल त्यांना निश्चित अभिमान होता. ही गोष्ट निर्विवाद आहे की विद्येचा मूळ प्रकाश पूर्व देशांतून पश्चिम देशांवर पडला आणि असेच निःसंशय प्रमाणावरून सिद्ध होते की, पृथ्वीचे या भागातील लोकांमध्ये विद्येची मूळ रूपे हजारो वर्षांपूर्वी ठाऊक होती. असे ते म्हणत असत (जांभेकर शताब्दी ग्रंथ २, ५१)

आपल्या विद्येतील, संस्कृतीतील चांगल्याचा अभिमान धरून पाश्चिमात्य विद्येचा ते आग्रहाने पुरस्कार करीत असत. यामागे भारतीयांच्या विद्येचे बळ वाढावे हा उद्देश होता. धार्मिक सुधारणा व्हाव्यात या त्यांच्या विचारातसुद्धा हीच दूरदृष्टी होती. 'शेषाद्री धर्मांतर प्रकरण' त्यांनी धसास लावले व त्याला पुन्हा धर्मात घ्यायला लावले. या प्रकरणी त्यांना प्रायश्चित्तही नाइलाजाने घ्यायला लागले.

### आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांच्या कार्याचा विस्तार

आचार्यांची त्यांच्या अंगी असलेल्या कर्तृत्वामुळे, विद्या-व्यासंगामुळे आणि तेरा भाषांच्या ज्ञानामुळे मुंबईतील प्रमुख विद्वान मंडळींत गणना झाली होती. ते मराठीतील पहिले वृत्तपत्र 'दर्पण'चे संस्थापक (६ जानेवारी १८३२) होतेच. तसेच मराठीतील पहिले मासिक 'दिग्दर्शन'चे संस्थापक संपादक. (१ मे १८४०) देखील होते. त्याचबरोबर पहिले असिस्टंट प्रोफेसर (नोव्हेंबर १८३४), 'बॉम्बे नेटिव्ह लायब्ररी' या पहिल्या सार्वजनिक वाचनालयाचे संस्थापक (सन १८४५). नेटिव्ह इंप्रुव्हमेंट सोसायटी या 'लोकसुधारणा' व्यासपीठाचे संस्थापक, पहिले मराठी शाळा तपासनीस (सन १८४४ ते १८५५), पहिल्या विद्यार्थी वसतिगृहाचे संस्थापक (१८४५), पहिल्या अध्यापक वर्गाचे संचालक (यावरून आजच्या डी.एड. व बी.एड. कॉलेजची संकल्पना त्या काळात आचार्यांनी मांडल्याचे लक्षात येते) (सन १९४५), ज्ञानेश्वरीची पहिली शिळाप्रतही त्यांनीच केली. याशिवाय पहिले दूरदृष्टीचे समाजसुधारक, महाराष्ट्राचे आद्यशिक्षणतज्ज्ञ, इतिहास संशोधक म्हणूनही त्यांचा उल्लेख अभिमानाने केला जातो.

### स्त्री-शिक्षणाचे अग्रदूत

*"तस्मात स्त्रियांनी विद्याभ्यास न करावा, हे शुद्ध अज्ञान आहे. यास शास्त्रीय किंवा लौकिक आधार काही नाही. यास्तव सर्वांनी आपापल्या मुलींकरवी विद्याभ्यास करावा, असा आमचा मनोदय आहे. पुरुषांपेक्षा स्त्रियांना व्यापार करण्याची बुद्धी सहापट अधिक आहे."*

स्त्री-शिक्षणाबद्दल आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांनी १७८ वर्षांपूर्वी वरील संकल्पना मांडली होती. त्यावरून स्त्री-शिक्षण हाच समाजसुधारणेचा खरा पाया आहे, हे त्यांनी ओळखले. त्या काळात स्त्रियांवर खूपच बंधने होती. हिंदू समाज कर्मकांड, कर्मठपणा आणि परंपरानुगतिकता यांनी बांधला गेला होता. स्त्री-शिक्षण व पुनर्विवाह, विधवा विवाह यांसारखे विषय चर्चिणेही धर्मभ्रष्टतेचे लक्षण मानले जाई. अशा परिस्थितीच त्यांनी 'दर्पण'मधून स्त्रियांच्या प्रश्नाबाबत मांडलेले विचार किती धाडसाचे व दूरदृष्टीचे होते; हे दिसून येईल.

स्त्री-शिक्षणाची दिशा, स्त्रियांचा वेदाभ्यास व विद्याभ्यास, स्त्री-पुरुषांना समान हक्क, स्त्री-शिक्षणाबद्दल दृष्टान्त, मुलीची मुंज का नाही? यांसारख्या निबंधातून जांभेकरांनी शास्त्राधार देऊन 'दर्पण'मधून लिखाण केलेले आढळते. जांभेकर ज्या काळात हे कार्य करत होते, त्या काळात सनातनी हिंदू पंडितांची कडवी भूमिका होती. त्यामुळे स्त्री-शिक्षण, धार्मिक व सामाजिक





अनुक्रमणिका

सुधारणाबाबतचे जांभेकरांचे विचार निश्चितच धाडसी होते. काळानुसार चालीरीती रूढी बदलल्या पाहिजेत, हा ठोस विचार त्यात होता.

**समाजसुधारक जांभेकर**

बाळशास्त्री यांचा जन्म जरी ब्राह्मण कुटुंबात झाला असला व स्वधर्मावर प्रेम करणारे असले तरी ते धर्मवेडे नव्हते. धार्मिकदृष्ट्या ते आस्तिक आणि सदाचारसंपन्न हिंदुधर्माभिमानी होते. मात्र असे असूनही धार्मिक आणि सामाजिक सुधारणांप्रकरणी ते सुधारक व व्यवहारवादी वृत्तीचे होते. निष्ठावंत सुधारक असेच त्यांचे वर्णन करावे लागेल. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात सतीसारखी अमानवी प्रथा सुरू होती. १९३० साली या मानवतेला काळिमा लावणाऱ्या प्रथेचे कायद्याने उच्चाटन झाले असले, तरीही देशाच्या काही भागात १८४०-४५ पर्यंत अधूनमधून हे प्रकार घडत होते. स्त्रियांना कोणी वालीच नव्हता. स्त्री-शिक्षणाचा पूर्ण अभाव होता. कर्मठ अशा पुरुषप्रधान संस्कृतीने तिला चूल आणि मूल यांच्यातच गुंतवून ठेवले होते. बालविवाह आणि बहुपत्नीकत्व या तर रूढ अशा समाजमान्य प्रथाच होत्या. प्रौढ किंवा जरठ वर आणि आठ-दहा वर्षांची बालिकावधू अशा प्रकारचेच बहुसंख्य विवाह होत. परिणामी बालविधवांचे प्रमाणही प्रचंड होते. विधवा विवाहास मान्यता नसल्याने अशा स्त्रियांचे आयुष्य अक्षरश: कुजून जात असे. अर्थात यात काहीतरी चुकते आहे, अशी कोणाचीच भावना नव्हती. शास्त्रीबुवांनी प्रथम याबाबत आवाज उठविला आणि स्त्री- शिक्षण, बालविवाह निषेध, विधवा विवाह अशा प्रकारच्या क्रांतिकारक विचारांचे बीजारोपण केले. असा प्रयत्न करणारे ते आद्य समाजसुधारक होत.

**अखेर १४६ वर्षांनी जांभेकरांचे स्मारक झाले**

मराठी वृत्तपत्रसृष्टीचे जनक म्हणून प्रामुख्याने परिचित असणारे आचार्य बाळशास्त्री जांभेकर हे महाराष्ट्रातील सामाजिक सुधारणांचा पाया रचणारे आद्य समाजसुधारकही होते. हिंदुस्थानचा स्वातंत्र्यलढा, सामाजिक चळवळी, शिक्षण क्षेत्र, कला क्षेत्र, औद्योगिक क्षेत्रात ज्यांनी ज्यांनी महाराष्ट्राला नेतृत्व दिले त्यांचे उचित मानसन्मान झाले व स्मारके उभारली गेली. परंतु शिक्षण, लोकजागृती, पत्रकारिता, समाजसुधारणा अशा अनेक क्षेत्रांत ज्यांनी अतिशय प्रतिकूल परिस्थितीत नव्या सामाजिक सुधारणांच्या विचारांचा प्रथम पाया घातला. असे आचार्य बाळशास्त्री जांभेकर मात्र १४६ वर्षे उपेक्षित राहिले होते. कोकणात किंवा जांभेकरांच्या जन्मभूमीत व कर्मभूमी मुंबई येथे किंवा महाराष्ट्रात कोठेही त्यांचे दृश्य स्मारक उभारले नाही. मात्र आमच्या पुढाकाराने स्थापन झालेल्या महाराष्ट्र पत्रकार कल्याण निधी या संस्थेच्या माध्यमातून आम्ही आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांच्या स्मरणकार्याचे सन १९९३ पासून काम हाती घेऊन जांभेकरांचे विविध स्तरांतील कार्य समाजापुढे यावे यासाठी खास प्रयत्न केलेले आहेत. मग त्यामध्ये आचार्यांचे पत्रकारितेतील कार्याचे महत्त्व लक्षात घेऊन त्यांच्या पोंभुर्ले, ता देवगड, जि. सिंधुदुर्ग या जन्मगावी पहिला राष्ट्रीय स्मारक प्रकल्प उभारला आहे, त्यांच्या स्मरणार्थ राज्यातील पत्रकारांना गेली १८ वर्षे अव्याहतपणे दिले जाणारे 'दर्पण' पुरस्कार देण्यात येतात.

"'दर्पण'कार आचार्य बाळशास्त्री जांभेकर आणि मराठी वृत्तपत्रसृष्टी" या त्यांच्यावरील माहितीपटाचे प्रकाशन, आचार्यांचे शैक्षणिक कार्यातील योगदान लक्षात घेऊन फलटण, जि. सातारा येथील सन १९९७ पासून सुरू असलेले आचार्य बाळशास्त्री जांभेकर माध्यमिक विद्यालय, जांभेकरांची माहिती ३ भाषांमध्ये प्रसिद्ध करणारे केंद्र, सरकारच्या डाक विभागाच्या वतीने संस्थेने केलेले विशेष लिफाफ्याचे प्रकाशन, अशा पद्धतीने आचार्यांचे कार्य चिरंतन ठेवण्यासाठी आम्ही या संस्थेच्या माध्यमातून प्रयत्नशील आहोत.

**जांभेकरांना मिळालेले अनेक मान-सन्मान**

* १८३१ मध्ये 'रॉयल एशियाटिक सोसायटी'च्या मुंबई शाखेतील भाषांतर समितीचे कार्यमंत्री म्हणून त्यांची निवड झाली होती.
* लंडन येथील 'जिऑग्रॉफीकल सोसायटीची मुंबई

शाखा सुरू झाली होती. त्याचे सन्माननीय सदस्यत्व व पुढे त्याचे पदाधिकारी म्हणूनही काम पाहिले.

* आचार्यांच्या शैक्षणिक व सामाजिक कार्याचा गौरव म्हणून १९४० मध्ये त्यांना त्या काळातील अत्यंत बहुमानाच्या 'जस्टीस ऑफ दि पीस' या पदावर नेमून गौरव करण्यात आला. अशा प्रकारे नेमण्यात आलेल्या जस्टीस ऑफ दि पीस (जे.पी.) यांना सुप्रीम, हायकोर्टात 'ग्रॅन्ड ज्यूरी'मध्ये बसण्याचा अधिकार असे.
* याशिवाय दि बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचे १८३० मध्ये डेप्युटी नेटिव्ह सेक्रेटरी, तर पुढे १८३२ पासून पूर्णवेळ नेटिव्ह सेक्रेटरी म्हणून काम पाहिले. त्या काळात हा मान किंवा हे पद फक्त युरोपियन, पार्शी, मुसलमान यांनाच मिळत असे.

### जांभेकरांची ग्रंथसंपदा

बाळशास्त्रींची ग्रंथसंपदा प्रामुख्याने त्यांच्या शिक्षण क्षेत्रातील कार्याच्या अनुषंगाने झाली आहे. उपलब्ध माहितीनुसार त्यांची प्रकाशित झालेली ग्रंथसंपदा १) नीतिकथा, २) सारसंग्रह, ३) इंग्लंड देशाची बखर (भाग १ व २), ४) भूगोल विद्या गणित भाग, ५) बालव्याकरण, ६) भूगोलविद्येची मूलतत्त्वे (ही दोन्ही पुस्तके त्यांच्या पश्चात् सुमारे २५ वर्षे प्राथमिक शाळेतून पाठ्यपुस्तक म्हणून चालू होती.), ७) हिंदुस्थानचा इतिहास, ८) हिंदुस्थानातील इंग्रजांच्या राज्याचा इतिहास, ९) ज्ञानेश्वरी या मौलिक श्रेष्ठ भक्तीग्रंथाचे त्यांनी मराठीत प्रथम शिळा प्रेसवर प्रकाशन केले आहे. याही व्यतिरिक्त अनेक विषयांवर ग्रंथ लिहिले.

बाळशास्त्रींनी वयाच्या अवघ्या १६ व्या वर्षापासून ते ३३ व्या वर्षापर्यंत नोकरीचे व इतर व्याप सांभाळून केलेली ग्रंथसंपदा लक्षात घेता त्यांच्या अष्टपैलू प्रतिमेची कल्पना येते.

आचार्य बाळशास्त्री जांभेकर हे समकालीनांत किती लोकप्रिय होते त्याची अनेक उदाहरणे देता येतील. विषमज्वराने त्यांचा दि. १७ मे १८४६ रोजी मृत्यू झाला. त्यांच्या मृत्यूनंतर तत्कालीन वृत्तपत्रातून त्यांच्यावर अग्रलेख आले होते. हा त्यांचा मरणोत्तर गौरवच होता. तसेच समकालीन विद्वानांना, उच्चपदस्त इंग्रज अधिकाऱ्यांना त्यांच्याबद्दल किती आदर होता हे मुंबईच्या सुप्रीम कोर्टातील न्यायमूर्ती सर अर्स्कन पेरी यांनी जांभेकरांच्या मृत्यूनंतर व्यक्त केलेल्या शोकसभेतील भाषणातून स्पष्ट होते.

'बाळशास्त्री यांच्या दु:खद मृत्यूने पश्चिम भारतावर जेवढी महान आपत्ती ओढवली आहे, तेवढी आपत्ती मुंबईतील कोणाही पुरुषाच्या मृत्यूने मग तो युरोपियन असो की एतद्देशीय असो अथवा तो कितीही मोठ्या दर्जाचा असो- ओढवणार नाही.'

(न्या. सर अर्स्कन परी, सुप्रीम कोर्ट मुंबई यांनी ग्रँड ज्युरी समोर केलेल्या उत्स्फूर्त भाषणातून १०-७-१८४६ च्या बॉम्बे कुरियर वृत्तपत्रातून)

असे हे आचार्य बाळशास्त्री जांभेकर खऱ्या अर्थाने लोकशिक्षणकार तर होतेच; पण महाराष्ट्रभूषण म्हणूनही त्यांचा लौकिक महाराष्ट्राच्या इतिहासात सुवर्णाक्षरानेच लिहिला जाईल हे नक्कीच. म्हणूनच त्यांच्या द्विजन्मशताब्दी निमित्ताने त्यांना ही शब्दरूपी विनम्र आदरांजली.

◇◇◇

**रवींद्र बेडकिहाळ**
महाराष्ट्र पत्रकार कल्याण निधी, फलटण, जि. सातारा.
मो. ९४२२४००३२१

**नवीन आजीव सभासद**

सवनीस विवेक कृष्णराव
कुलकर्णी सविता पुणे
कोल्हटकर अनुराधा
जाधव रेखा रमेश
देशपांडे रवींद्र

देवरुखकर संध्या विनय
राऊत जितेंद्र चंद्रकांत, चिंचवड
कोडीलकर दत्तकुमार श्रीपाद, पुणे
पायगुडे भाग्यश्री मारुती, पुणे
सोसे अतिश सुरेश

तांबोळी संतोष व्यंकटेश, पुणे
कुलकर्णी लक्ष्मण गंगाधर, पुणे
कानिटकर मेधा महेश, पुणे
बेहेरे अनुपम श्रीपाद, बदलापूर
पाटील श्रीधर दत्तात्रय, बदलापूर



अनुक्रमणिका



कन्नड साहित्यातील वसंत

# वसंत दिवाणजी

– डॉ. सुहास पुजारी

*कवी, कादंबरीकार, समीक्षक आणि अनुवादक म्हणून कन्नड साहित्यात मौलिक योगदान करणारे प्रतिभावंत लेखक 'कुसुमाकर देवरगेण्णूर' तथा वसंत अनंत दिवाणजी यांचे बंगळूर येथे निधन झाले. त्यांच्या व्यक्तित्वावर आणि वाङ्मयीन कर्तृत्वावर प्रकाश टाकणारा लेख.*

कवी, कादंबरीकार, समीक्षक आणि अनुवादक अशा विविध भूमिकांतून कन्नड साहित्यात मूल्यवान योगदान देणारे प्रतिभावंत लेखक म्हणून वसंत दिवाणजी विख्यात आहेत.

वसंत दिवाणजी यांचा जन्म १५ फेब्रुवारी १९३० रोजी कर्नाटक राज्यातील विजापूर जिल्ह्यातील देवरगेण्णूर या गावी झाला. त्यांचे पूर्ण नाव वसंत अनंत दिवाणजी, तर आईचे नाव नर्मदा असे होते. दिवाणजींचे वडील व्यवसायाने शेतकरी आणि वृत्तीने देशभक्त होते. तत्कालीन देशस्थितीमुळे त्यांनी स्वातंत्र्य चळवळीत स्वत:ला झोकून दिले होते. त्यासाठी त्यांना सहा महिन्यांचा कारावासही भोगावा लागला होता. १९४३ साली चरितार्थासाठी म्हणून त्यांना त्यांचे मूळ गाव सोडावे लागले; आणि ते आपल्या कुटुंबासह सोलापुरास आले. सोलापुरातील जुन्या मिलमधील रेशनिंग विभागात ते रुजू झाले. तत्पूर्वी विजापूर जिल्ह्यातील देवरगेण्णूर, विज्जरगी, गलगली, वावानगर या खेड्यांतील शाळांमधून दिवाणजी यांचे प्राथमिक शिक्षण झाले.

बालपणापासूनच ते अत्यंत कुशाग्र बुद्धीचे म्हणून ओळखले जात होते. त्यांच्या माध्यमिक शिक्षणाची वाटचाल मोठी रोचक आहे. सातवीपर्यंतचे शिक्षण घेतलेल्या कोवळ्या वयात त्यांना कन्नड महाकवी द. रा. बेंद्रे यांचे साहित्य मुखोद्‌गत होते. सोलापुरात आल्यानंतर त्यांनी आपल्या वडिलांकडे बेंद्रे यांची भेट घडवून आणण्याचा हट्ट धरला. बेंद्रे यांच्यासारख्या थोर लेखकाची भेट घेताना आपला मुलगा अगदीच पोरवयाचा वाटेल म्हणून त्यांच्या वडिलांनी त्यांना धोती आणि कुडता असा पेहराव करायला लावून त्यांच्या भेटीस नेले.



बेंद्रे यांनी अतिशय प्रेमाने लहानग्या वसंताविषयी चौकशी केली. तेव्हा त्यांचे संपूर्ण साहित्य वासण्णाला मुखोद्‌गत असल्याचे वडिलांनी सांगितले. शाळकरी वयातील वसंताने ते म्हणून दाखवले. तेव्हा बेंद्रे यांना मोठे कौतुक वाटले.

त्यांनी लहानग्या वसंताच्या स्मरणशक्तीचे कौतुक करून त्याच्या वडिलांना सल्ला दिला की, "या मुलाचे हे कपडे बदला. त्याला लहान मुलाचे कपडे घाला. त्याला शाळेत जाऊ द्या! शिक्षण घेऊ द्या!"

बेंद्रे यांचा सल्ला शिरोधार्य मानून दिवाणजींच्या वडिलांनी त्यांना सोलापुरातील शाळेत घालण्याचा खटाटोप चालवला. तो महिना होता फेब्रुवारीचा. परीक्षेचे दिवस जवळ आलेले असताना शाळेत प्रवेश कसा आणि कोण देणार? दिवाणजींच्या वडिलांनी बेंद्रे यांना ही अडचण सांगितली. प्रशालेच्या मुख्याध्यापकांना सांगून बेंद्रे यांनी त्यांना शाळेत प्रवेश मिळवून दिला आणि सोलापुरातील आण्णप्पा काडादी प्रशालेतून दिवाणजी मॅट्रिक झाले. आपल्या गुरूंचे हे ऋण दिवाणजी यांनी हृदयी जपले; आणि पुढे अनेक परीने फेडले.





आण्णप्पा काडादी प्रशालेतून मॅट्रिक पूर्ण केल्यानंतर मुख्याध्यापक एलाझा यांनी दिवाणजी यांची योग्यता लक्षात घेऊन त्यांना शिक्षक म्हणून सेवेची संधी दिली; आणि पहिल्या पगारानंतर काहीशा थट्टेने आणि पुष्कळशा प्रेमाने त्यांना स्वत:च्या मापाचे नवीन कपडे शिवून घेण्यास सांगितले. कारण माध्यमिक शिक्षण चालू होते तोपर्यंत घरच्या आर्थिक स्थितीमुळे मामाचे कपडे घालूनच ते शाळेत जात असत.

आरंभीची सात वर्षे आण्णप्पा काडादी प्रशालेत दिवाणजी यांनी शिक्षण म्हणून सेवाकार्य केले. पुढे त्यांनी नामवंत इतिहास अभ्यासक प्राचार्य श्रीराम शर्मा यांच्या सल्ल्यानुसार आणि कन्नड महाकवी डॉ. द. रा. बेंद्रे यांच्या मार्गदर्शनानुसार सोलापुरातील दयानंद महाविद्यालयातून कन्नड विषयातील पदवी आणि पदव्युत्तर शिक्षण घेतले. सांगली येथील विलिंग्डन कॉलेजचे प्राचार्य आणि सुविख्यात कन्नड साहित्यिक डॉ. आर. एस. मुगळी यांच्या मार्गदर्शनानुसार त्यांनी 'संतकवी पुरंदरदास यांचे जीवन आणि साहित्य' या विषयावर संशोधन प्रबंध लिहून पुणे विद्यापीठाची पीएच.डी. (१९६५) पदवी संपादन केली.

पीएच.डी.च्या पदवी संदर्भातही मोठे नाट्य त्यांच्या बाबतीत घडले. पीएच.डी.चा प्रबंध विद्यापीठास सादर करून आणि परीक्षेची सर्व प्रक्रिया होऊन तीन वर्षे उलटून गेली तरी त्यांना विद्यापीठाकडून पदवी काही जाहीर झाली नाही. त्याला काही अंशी दिवाणजी यांचा विनम्र स्वभावही कारणीभूत होता.

आपल्याला अद्यापि पदवी का जाहीर झाली नाही, अशी विचारणा त्यांनी आपले संशोधन मार्गदर्शक डॉ. मुगळी यांच्याकडे अथवा विद्यापीठाकडे कधी केली नाही. दिवाणजी यांची वृत्ती आणि त्यांना मुगळी यांच्यावषयी वाटणाऱ्या आदरभावामुळे त्यांच्या दृष्टीने औद्धत्य ठरेल असे हे धाडस त्यांनी कधी केले नाही.

तीन वर्षे उलटली तरी पदवी जाहीर झाल्याचे पत्र विद्यापीठाकडून मिळाले नाही, याचे आश्चर्य त्यांचे लहान बंधू प्रल्हाद दिवाणजी यांनाही वाटत होतेच.

पुढे योगायोगाने मुंबई येथे त्यांची आणि डॉ. मुगळी यांची भेट झाली तेव्हा त्यांनी या संदर्भात विचारणा केली. तेव्हा डॉ. मुगळी म्हणाले, "पीएच.डी. तर केव्हाच त्यांना मिळाली आहे, पण साधे पत्र लिहिण्याइतकेही स्मरण वसंताला आमचे राहिले नाही." हे ऐकून दिवाणजींचे बंधू अधिकच गोंधळले. त्यांनी वस्तुस्थिती कथन केली, तेव्हा डॉ. मुगळी यांनी विद्यापीठात त्यांना चौकशी करण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणे त्यांनी विद्यापीठातील संबंधित विभागाकडे विचारणा केली. विद्यापीठाच्या कार्यालयात हा सर्व पत्रव्यवहार पाहणाऱ्या एक बाई होत्या. त्यांनी सांगितले की, 'कार्यवाही करून फाईल क्लोज करा असे म्हटल्याने ती फाईल आम्ही क्लोज करून ठेवून दिली आहे,' डॉ. मुगळी यांच्याशी झालेली चर्चा त्यांनी त्या बाईस कथन केली. तेव्हा कपाटावर गठ्ठ्यात बांधून ठेवलेली ती फाईल त्या बाईंनी पुन्हा उघडली.

आश्चर्य म्हणजे त्यात दिवाणजी यांना पीएच.डी. पदवी जाहीर करण्यासंबंधीचा अहवाल तयार होता. त्या बाईंनी दिवाणजींच्या बंधूंकडे झाल्या प्रकाराबद्दल खेद प्रकट केला. त्यानंतर पीएच.डी. पदवी जाहीर झाल्याचे विद्यापीठाचे अधिकृत पत्र दिवाणजी यांना मिळाले. त्यांनी डॉ. आर. एस. मुगळी यांना आपल्याकडून मला पुष्कळ गोष्टी शिकता आल्या. या कृतज्ञतेच्या भावनेसह ही आनंदवार्ता पत्राने कळवली. त्यानंतर काही दिवसांनी डॉ. मुगळी यांचे दिवाणजी यांना अभिनंदनाचे पत्र आले. त्यात त्यांनी लिहिले होते, 'तुम्ही मुळातच बुद्धिमान आहात, माझ्याकडून तुम्ही काय शिकला हे मला माहीत नाही. पण माझ्याकडून एक गोष्ट मात्र शिकता येण्यासारखी आहे, ती म्हणजे निरंतर पत्रव्यवहार.'

१९५६ साली थोर लेखक आणि कवी द. रा. बेंद्रे यांच्या सेवानिवृत्तीनंतर सोलापुरातील दयानंद महाविद्यालयात त्यांनी कन्नड भाषा आणि साहित्याचे प्राध्यापक म्हणून सेवेचा श्रीगणेशा केला.

द. रा. बेंद्रे यांच्या सेवानिवृत्तीनंतर त्यांची जागा





अनुक्रमणिका

वसंत दिवाणजी हेच भरून काढू शकतील, असा विश्वास प्राचार्य श्रीराम शर्मा यांना वाटत होता. तो दिवाणजी यांनी सार्थ ठरवला.

पुढे कन्नड विभागप्रमुख या पदावरून ते १९९० साली सेवानिवृत्त झाले. दिवाणजी यांनी ज्या शिक्षण संस्थेत अध्ययन केले, शिक्षण घेतले त्याच शिक्षण संस्थेत अध्यापनाचे कार्य करण्याची त्यांना आण्णप्पा काडादी प्रशालेनंतर अशी दुसरी संधी लाभली.

वसंत दिवाणजी हे बहुभाषाकोविद होते. कन्नडसह संस्कृत, मराठी तसेच इंग्लिश भाषा आणि साहित्याचा त्यांचा दांडगा व्यासंग होता. याखेरीज गणित, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे, ज्योतिषशास्त्र, भारतीय संगीत, आयुर्वेद, होमिओपॅथी, औषध विज्ञानशास्त्र अशा अनेक विद्याशाखांचा त्यांचा सखोल आणि सूक्ष्म अभ्यास होता.

एक कवितासंग्रह, एक लघुकादंबरी, चार कादंबऱ्या, दोन समीक्षा ग्रंथ, एक अनुवादित ग्रंथ, एक व्याख्यानसंग्रह आणि एक प्रबंध असे मोजके; परंतु सकस साहित्य दिवाणजी यांनी निर्माण केले आणि कन्नड साहित्यात आपली स्वतंत्र मुद्रा त्यांनी उमटवली.

त्यांनी कविता लेखनासह आपले सर्व लेखन 'कुसुमाकर देवरगेण्णूर' या टोपणनावानेच केले. याला अपवाद ठरला तो केवळ 'प्रसादयोग' (१९७२) या संशोधन ग्रंथाचा. पीएच. डी.चा हा प्रबंध तेवढा त्यांनी आपल्या मूळ नावासह प्रकाशित केला.

दिवाणजी यांच्या लेखनप्रवासास सुरुवात झाली ती 'स्वप्ननौके' (१९५६) या त्यांच्या कविता-संग्रहापासून. 'स्वप्ननौके'त समाविष्ट असलेली कविता ही प्रामुख्याने प्रेमकविता आहे आणि स्त्री ही या कवितेच्या केंद्रस्थानी आहे.

'मुगियद कथे' (न संपणारी गोष्ट) ही त्यांची लघुकादंबरी १९६५ साली प्रकाशित झाली; परंतु तशी ती उपेक्षितच राहिली. एक समर्थ प्रतिभेचा कादंबरीकार म्हणून त्यांनी खरे लक्ष वेधून घेतले ते 'नाल्कने आयाम' (चौथा आयाम) या १९६६ साली प्रकाशित झालेल्या कादंबरीने.

पुरोगामी विचारांच्या तरुण आणि संवेदनशील मनावर या कादंबरीने विलक्षण प्रभाव टाकला. दारिद्र्य आणि सामाजिक विषमतेचे भान त्यांच्या आरंभीच्या या साहित्यातून प्रभावी रीतीने व्यक्त झाले आहे.

तीन दशकांच्या प्रदीर्घ विरामानंतर १९९३ साली कन्नड साहित्यातील मैलाचा दगड ठरावी अशी 'निरींद्रिय' ('वेवकूव') या शीर्षकाची त्यांची एक महत्त्वाची कादंबरी प्रकाशित झाली. जीवन अर्थपूर्ण बनवण्यासाठी स्त्रियांची भूमिका निर्णायक ठरू शकते, याचा कलात्मक आविष्कार या कादंबरीतून त्यांनी घडवला. पुरुषी वर्चस्वातून घडणाऱ्या निर्घृण अपराधाचे विदारक चित्रणही या कादंबरीत घडते.

स्त्रियांचे अनावश्यक उदात्तीकरण वा भाबडे चित्रण या कादंबरीत नाही. विचारशील मनास अंतर्मुख करण्याचे असाधारण सामर्थ्य तिच्यात प्रत्ययास येते. रचनेच्या दृष्टीनेही ही कादंबरी वैशिष्ट्यपूर्ण आहे.

रचनात्मकतेच्या दृष्टीने नवे वळण स्वीकारणारी आहे. प्रतिभा आणि स्वप्नांच्या साह्याने मानवी वृत्तीचा आणि त्याच्या जाणीव व्यूहाचा दिवाणजींच्या प्रतिभेने या कादंबरीतून अत्यंत सूक्ष्म पातळीवर आविष्कार घडविला आहे. त्यांच्या अन्य कादंबरीसृष्टीतूनही याचा त्यांनी कलापूर्ण प्रत्यय दिलेला आहे. सखोल अभ्यास आणि चिंतनातून उभी केलेली ही त्यांची स्वप्नसृष्टी कन्नड साहित्याला नवा आयाम देणारी ठरली. कथात्म आणि सौंदर्यात्म दृष्टीचा वस्तुपाठ या कादंबरीत पाहायला मिळतो.

'परिघ' (१९९६) ही दिवाणजी यांची आणखी एक लक्षणीय कादंबरी. उपहास आणि उपरोधाचे प्रभावी उपयोजन त्यांनी या कादंबरीत केले आहे. कलावंताचे व्यक्तिमत्त्व आणि लौकिक व्यक्तिमत्त्व यांच्यातील विसंगती, व्यक्तिगत महत्त्वाकांक्षा, मत्सर, असूया अशा विविध पैलूंना ही कादंबरी विलक्षण सामर्थ्याने मांडते.

'बयलु बसिरु' (मुक्त आणि गर्भाशय) ही २००५ साली प्रकाशित झालेली दिवाणजी यांची अखेरची कादंबरी. जागतिकीकरण आणि त्यामुळे निर्माण झालेल्या

अनिष्ट स्थितीचे दुष्परिणाम या कादंबरीतून त्यांनी दाखवून दिले आहेत. मनुष्य हा आईच्या गर्भाशयात असेपर्यंतच सुरक्षित आहे, मुक्त जगात तो अनेक परीने असुरक्षितता अनुभवतो आहे, मानवाचा इतिहास म्हणजे सुरक्षितता आणि असुरक्षितता यांच्यातील लपंडावाचा खेळ होय, हे या कादंबरीचे विचारसूत्र आहे. दिवाणजी यांचे साहित्य बाह्य जगतातील वास्तवाला असे मुखरित करते आणि अंतर्मनालाही साद घालते.

'प्रसादयोग' (१९७२) हा त्यांचा ग्रंथ म्हणजे पीएच.डी. पदवीकरिता 'संतकवी पुरंदरदास यांचे जीवन आणि साहित्य' या विषयावर लिहिलेल्या शोध प्रबंधाचे ग्रंथरूप होय. कल्पना आणि पुराणकथांतून बाहेर पडून संतकवी पुरंदरदासांचे जीवन आणि कार्य यांची पुनर्मांडणी या संशोधन ग्रंथात त्यांनी केली आहे.

दिवाणजी हे द. रा. बेंद्रे यांना आपले आदर्श मानत होते. ते त्यांचे शिष्य आणि मानसपुत्र होते. डॉ. द. रा. बेंद्रे यांचे व्यक्तित्व आणि साहित्य हे दिवाणजी यांच्या नेहमीच आस्थेचा, आदराचा आणि चिंतनाचा विषय राहिले. त्यातूनच बेंद्रे यांच्यासंबंधीचे त्यांचे वाङ्मयीन कार्य सिद्धीस गेले. कर्नाटक विद्यापीठात बेंद्रे यांच्या साहित्यावर त्यांनी दिलेल्या व्याख्यानांचा संग्रह 'गाळी हेज्जे हिडिद सुगंध' या नावाने प्रकाशित झाला आहे.

बेंद्रे यांच्या साहित्यावरील एका समीक्षा लेखसंग्रहास 'गुरुपौर्णिमा' असे अन्वर्थक शीर्षक देऊन त्यांनी आपली गुरुभक्ती प्रकट केली आहे. बेंद्रे यांनाही आपल्या या शिष्याप्रती प्रेम आणि अभिमान वाटत असे.

सोलापुरातील दयानंद महाविद्यालयात झालेल्या एका समारंभात बेंद्रे म्हणाले होते, "तुमच्या मार्गदर्शनाखाली किती विद्यार्थी पीएच.डी. झाले असे लोक मला विचारतात, तेव्हा मी म्हणतो, आकड्याचे काय घेऊन बसलात. मी इतकेच म्हणेन की वसंत दिवाणजी हा एक विद्यार्थी माझ्याकडे असा तयार झाला आहे की, मी कुठे चुकलो तर ती चूक माझ्या निदर्शनास आणून देऊ शकेल."

कादंबरीच्या स्वरूपाविषयी चिंतनगर्भ साहित्यविचार मांडणारा 'नक्षेगे एटुकद कडलु', हा ग्रंथ त्यांनी सिद्ध केला आहे. गंगाधर गाडगीळ यांच्या 'दुर्दम्य' या मराठी कादंबरीचा त्यांनी केलेला कन्नड अनुवाद साहित्य अकादमीतर्फे प्रकाशित झाला आहे. 'वयलु वसिरु' या कादंबरीचा रे. रा. मगाई आणि ल. सि. हनगंडी यांनी केलेला 'घरट्याच्या शोधात' (२००८) हा मराठी अनुवाद, मैसूर नटराज यांनी केलेला 'The Void and The Womb' हा इंग्लिश अनुवाद प्रकाशित झाला आहे.

वसंत दिवाणजी तथा कुसुमाकर देवरगेण्णूर यांच्या वाङ्मयीन कर्तत्वाचा सर्वांगीण परिचय 'अवगाह' (२००८) या एस. एस. राघवेंद्रराव यांनी संपादित केलेल्या समीक्षात्मक गौरवग्रंथातून मिळतो. 'बोगसितुंबा भक्ती हिडिदु' (२००८) हा डॉ. एन. जी. उपाध्ये लिखित समीक्षा ग्रंथातदेखील दिवाणजी यांच्या समग्र साहित्याचा परामर्ष घेतला आहे.

दिवाणजी यांचे साहित्य आणि त्यांच्या साहित्याची भाषा ही देश, काल, परिस्थितीच्या पलीकडे जाऊ पाहणारी आणि सर्वांना भावेल, सर्व स्तरांतील वाचकांच्या अंतर्यामी भरून राहील अशी आहे. तिला संस्कृतप्रचुरतेचे वावडे नाही नि ती केवळ विजापूर परिसराची ग्रामीण बोलीही नाही. ती सर्वस्पर्शी आणि सार्वकालिक ठरू पाहणारी भाषा आहे.

दिवाणजींच्या लेखनात विचार आणि सौंदर्य यांचा मनोज्ञ संगम झालेला प्रत्ययास येतो. त्यांचे लेखन आणि त्यांचीं जगाकडे पाहण्याची दृष्टी परस्परपोषक होती. निरंतर वाहती राहिलेली जिज्ञासा, ज्ञानग्रहण करणारी विलक्षण स्मरणशक्ती, अफाट वाचन, जीवनानुभव वेचण्याची अखंड तयारी आणि ज्ञानपीठ पुरस्काराने सन्मानित झालेले द. रा. बेंद्रे यांच्यासारखे प्रतिभाप्रभू गुरू यामुळे दिवाणजी यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व बहरले आणि रसिकांना कन्नड साहित्यातील हा वसंत अनुभवता आला.

दिवाणजी यांचे व्यक्तिमत्त्व अतिशय संवेदनशील

होते. या संदर्भात त्यांचे बंधू श्री. प्रल्हाद यांनी सांगितलेली एक हृद्य आठवण कथन करण्याचा मोह होतो. दिवाणजी हे तेव्हा सोलापुरातील वेन्नुरनगरमधील आपल्या निवासस्थानी राहत होते. त्या वेळी त्याचे वय साधारण सत्तरच्या आसपास असावे.

अगदी पहाटेच्या वेळी त्यांचे बंधू मुंबईहून सोलापूरला आले होते. ते दारात पोचले तेव्हा हा प्रतिभावंत लेखक दारासमोर रांगोळी घालण्यात मग्न होता. तेव्हा त्यांच्या रांगोळी घालण्यात व्यत्यय येऊ नये म्हणून ते काही वेळ तसेच स्तब्ध उभे राहिले.

रांगोळी घालून झाल्यानंतर त्यांनी याबद्दल कुतूहलाने विचारले. तेव्हा दिवाणजी म्हणाले, "ती (प्रतिभा) आजारी आहे. दारासमोर रांगोळी घातलेली पाहून तिला प्रसन्न वाटते, म्हणून मी रांगोळी घालतोय." (दिवाणजी यांच्या सहचारिणीचे नाव प्रतिभा. त्या आजारी होत्या.) या छोट्याशा प्रसंगातूनही दिवाणजी यांच्या 'कुसुमाकर' व्यक्तिमत्त्वाचे लोभस दर्शन घडते.

दिवाणजी यांनी कन्नड साहित्याच्या अंगणात घातलेली रांगोळीदेखील अशीच प्रसन्नमोहक आणि विचारसौंदर्याने नटलेली आहे.

तीन वेळा कर्नाटक साहित्य अकादमी पुरस्कार, तसेच श्रीगुरुनारायण प्रशस्ती पुरस्काराने त्यांच्या या वाङ्मयीन कर्तत्वाचा सन्मान झाला आहे. १७ एप्रिल २०१२ रोजी बंगळूर येथे कन्नड साहित्यातील हा वसंत सरला.

◇◇◇

**प्रा. डॉ. सुहास पुजारी**
'अक्षरपान', ७/८, मंत्री चंडक इस्टेट,
किल्लेदार सांस्कृतिक भवनाजवळ, होटगी रस्ता परिसर,
सोलापूर ४१३ ००३, स्थिरभाष (०२१७) २६०५५३४
चलभाष ९९६०२७२०३१.
E.mail-suhaspujari18@gmail.com





अनुक्रमणिका

# ‘कन्नडवादे बेळगावची उडे लाल माती’



– प्रा. वाग्वैद्य. मो. गो. धडफळे

*श्री ज्ञानदेवांपासून ते फादर स्टिव्हन्स व माधव ज्युलियनांपर्यंत मराठी भाषेचा अभिमान-विषय हा विधायक ऊर्जा निर्माण करण्यासाठी होता. सामान्यांची भाषा ज्ञानदायिनी व्हावी म्हणजे पर्यायाने ज्ञानापासून उपेक्षित झालेल्या सर्वांसाठी ज्ञानमंदिराची चिलखती-दारे सहज उघडावीत. ‘शहाणे करुनि सोडावे । सकळ जन ॥’ आणि राजापासून प्रजा तसेच ज्ञानी पंडितांपासून अज्ञानपीडित प्रजा यांच्यातील दरी नष्ट होऊन एकसंध सुसंस्कृत समाज निर्माण व्हावा हेच ध्येय होते. भाषाभगिनींशी वैर करण्यापेक्षा त्यांचेही ज्ञान आत्मसात करावे हाच सर्व युगंधरांचा ध्यास होता. ‘‘राजा कालस्य कारणम्’’ एवढेच नव्हे तर ‘‘राजभाषा कालस्य कारणम्’’ व्हावी; परंतु त्यासाठी राजभाषा ही जनभाषा झाली पाहिजे. इंग्रज़ी विद्याही शिकून शहाणे झाले पाहिजे म्हणजे आपण समर्थ राज्यकर्ते होऊ असा विचार होता. मराठी-कानडी वाद कानडीच्या सक्तीमुळे निर्माण झाला आहे; परंतु ह्या दोन्हीही भाषांचा प्राचीन काळापासूनचा सख्यभाव वाग्वैद्य- मो. गो. धडफळे यांनी मांडला आहे. त्याची आज दोन्हीही राज्यांना गरज आहे.* – *संपादक*

कन्नड- मराठी या भारतीय भाषांमधील अकारण निर्माण झालेल्या खेदकारक वादाविषयीच्या या लेखाचे शीर्षक दिवंगत कविवर्य केशवकुमार यांच्या ‘झेंडूची फुले’ या विडंबन काव्यसंग्रहातील ‘अरुण’ या कवितेचा एक चरण आहे.

इंग्रज- अमदानीने भारताचे चांगले केले की वाईट हा विषय विलक्षण अवघड आहे. ईस्ट इंडिया कंपनीच्या द्वारा ब्रिटिशांची भारतावर सत्ता (आपल्या भाषेत भारताची गुलामगिरी) स्थापन झाली. याने बहुधा वाईट व चांगले दोन्ही केले. इंग्रजीसारखी प्राय: (पूर्णपणे नव्हे) जागतिक माध्यमाची भाषा भारतीय शिकले. शेक्सपियरसारख्या महान नाटककाराची नाटके, वर्डस्वर्थ शेले, बायरल यांच्यासारख्या फ्रेंच राज्यक्रांतीने प्रभावित झालेल्या कवींचे उत्तम काव्य, बर्नाड शॉ रस्कीन यांसारख्या विचारवंतांचे वैचारिक धन, थॉमस हार्डीसारख्या कादंबरीकारांच्या कादंबऱ्या हे साहित्यधन.

आगगाडी, विमाने, यासारखी यंत्रविद्या, हा भारतीयांचा लाभ आहे. इंग्रज- अमदान नसती तर आजच्या जगात भारत कोणत्या अवस्थेत असता हे सांगणे भल्या भल्या इतिहासकारांनाही सांगणे मुश्कील होईल. किंबहुना ‘अखंड भारत’ (India as a nation) अस्तित्वात तरी आला असता का? की विविध लहान लहान आपापसांत झगडणारी राज्येच राहिली असती? अंगांनी, बंगांवर व वंगांनी कलिंगांवर हल्ले चालतच राहिले असते? इंग्रजांनी ‘भेदनीती’ अवलंबिली (फोडा व झोडा) असे आपण सहजपणे म्हणतो; पण याआधीच राज्यात आपापसांत धार्मिक, आर्य- अनार्य, राज्यराज्यांतील बेबनाव ही काय इंग्रजांची निर्मिती होती?

विज्ञानाबरोबरच भारतीय संस्कृती (मनुस्मृती, याज्ञवल्क्य स्मृती), संस्कृत प्राकृत पाली भाषेचा मूलगामी अभ्यास भारतीयांनी केला की इंग्रजांनी? मॅक्सम्युरलने भारतीय प्राचीन साहित्य-तत्त्वज्ञान यांना उजाळा आणला. भारतीय संस्कृतीतील ‘सतीची चाल’ इत्यादी अनिष्ट परंपरांना कायदे करून भारताला सुसंस्कृत केले, ते आम्हा भारतीयांनी की परकीय सत्ताधारी ब्रिटिशांनी? मावळी मेळ्यात ‘‘सायबांचे पोर लई अकली रं! बिन बैलाची गाडी त्यानं हाकली रे!’’ हे ब्रिटिशांचे अप्रत्यक्ष योगदान कसे मान्य झाले?

मला ब्रिटिशांचा एक आदर्श विलक्षण स्तुत्य

वाटतो, ता म्हणजे भारताचे शासकीय विभाग त्यांनी मुंबई सरकार मद्रास (चेन्नई) सरकार असे पाडले. मुंबई शासन पार धारवाडपर्यंत दक्षिणेला तर कराचीपर्यंत उत्तरेला स्थिर केले. सैन्याबाबत मराठा पलटण, महार पलटण, शीख पलटण, जाठ पलटण, गोरखा पलटण असे भाग पाडून भेदाचे बीज रोवले खरे पण ब्रिटिश अमदानीत "कानडीने केला मराठी भ्रतार" ही एकोप्याची, रोटीबेटी व्यवहाराची वहिवाट चालू राहू शकली.

स्वतंत्र भारताने पहिला महत्त्वाचा (दुही फैलावणारा) फार मोठा निर्णय कोणता घेतला असेल तर 'भाषावार प्रांतरचना.' आम्हीच आमच्या निर्णयाने भारतीय एकात्मतेला व अखंडतेला तडा पोचवला.

कर्नाटक व तमिळनाडूमध्ये कावेरीच्या पाण्याच्या वाटपावरून झगडे सुरू झाले. 'मुंबई-बेळगाव-कारवार'सकट संयुक्त महाराष्ट्र हवा या नात्याने अखंड भारताचा केवळ घोषच उरला. आमचे मंत्री व्याख्यानांच्या शेवटी 'जय भारत. जय महाराष्ट्र' तर कर्नाटकात जय भारत, जय कर्नाटक' असे म्हणू लागले खरे; पण प्रत्यक्षात महाराष्ट्र व कर्नाटक यांच्यात बेळगावच्या कन्नड सक्तीने लाल मातीचा धुराळा उडतच राहिला. किती दिवस हे बेळगावचे घोंगडे भिजत राहणार आहे.

'काश्मीरवाद' हा भारत व पाकिस्तान या सख्य नसणाऱ्या दोन राष्ट्रांतला वाद आहे, पण बेळगावची कन्नडसक्ती ही अखंड भारताच्या दोन शेजारी प्रांतांतील वाद आहे. तो भारतीय केंद्र शासन आज इतकी वर्षे सोडवू शकला नाही. ही अभिमानाची बाब आहे की नामुष्कीची?

मी मूळ महाराष्ट्रीय असल्यामुळे मला महाराष्ट्राविषयी नैसर्गिक 'मम-ता' व अभिमान आहे; पण मी तितकाच एक सच्चा भारतीय आहे. भारताचा एक कन्नडिगांचा प्रांत त्याबद्दल माझ्या मनात 'दुस्वास' का असावा? कन्नडिगांनी व महाराष्ट्रीयांनी केंद्र शासनाने काही निर्णय घेतल्यास तो समंजसपणे मान्य करायला नको का?

मी एका संस्कृत परिसंवादात कळीचे व्याख्यान द्यायला बंगळूरला गेलो होतो. व्याख्यानास अध्यक्ष होते कर्नाटकचे राज्यपाल. मी अखेरीस म्हणालो, "एरिक हारिसु कर्नाटकद मत्तु महाराष्ट्र द थरडुक्क बावटं" (उभवू या, फडकवू या कर्नाटक व महाराष्ट्र या दोहोंचा ध्वज). प्रचंड टाळ्यांचा कडकडाट झाला.

बेळगाव (खरे तर बेळगावी) हे आजमितीस कर्नाटकात आले. तेथे कन्नड माध्यमाच्या शिक्षण संस्था कागदोपत्री असणे स्वाभाविक असले तरी मूळ ब्रिटिश अमदानील या मुंबई शासकीय प्रांतात महाराष्ट्रीय बहुसंख्य आहेत. त्यांच्यावर कन्नडची सक्ती मला अनुचित वाटते. मी स्वत: स्वखुषीने वयाच्या अठ्ठावन्नाव्या वर्षी कन्नड प्रमाणपत्र परीक्षा उत्तम रीतीने 'पसार' झालो. पुण्यात माझ्यावर कन्नड शिकण्याची कोणीच सक्ती केली नव्हती. मी आपखुषी (शी) ने ती भाषा शिकलो व मला त्याचा विलक्षण लाभ झाला.

कर्नाटक शासनाची बेळगावी बहुसंख्य महाराष्ट्रीयांवर कन्नडसक्ती मला अनुचित, अभारतीय व म्हणून निषेधार्थ निश्चितच वाटते. पण याचसाठी पुण्यातील 'कन्नड-मराठी, सस्नेहसंवर्ध संस्था' करत असलेले महान कार्य अभिनंदनीय व पुरस्करणीय वाटते. अहो, भाषेपेक्षा धार्मिक भेद अधिक त्वेषकारक व द्वेषकारक असतात, पण आमच्या पुण्यात मुस्लिम बंधूंमधील काही काही घरी गणपती बसवतात, तर गुरुवार पेठेत मुस्लिमांनी सार्वजनिक गणपती बसवून हिंदू विधीप्रमाणे पूजन, आरत्या, खिरापत व विसर्जन केले. या पार्श्वभूमीवर जी 'कानडी मराठी भ्रतार करते' त्या कन्नडिगांनी व महाराष्ट्रीयांनी काही वादाचे मुद्दे सलोख्यात सोडवायला काय हरकत आहे? बेळगावच्या लालमातीचा धुराळा कायमचा बसला पाहिजे.

याच संदर्भात मला कर्नाटक व महाराष्ट्र या दोन भारतीय राज्यांचे प्राचीन लागेबांधे व कर्नाटकाच्या महाराष्ट्राला दिलेल्या तीन महान देणग्यांचे या लेखाद्वारे स्मरण करून द्यायचे आहे. आम्ही महाराष्ट्रीयांनाही मात्सर्यमुत्सार्य विचार्य कार्यार्थ (मत्सर वृत्ती बाजूला सारून विचारपूर्वक कार्य करायला) हवे.



अनुक्रमणिका

कर्नाटकाच्या महाराष्ट्राला तीन मोठ्या देणग्या आहेत. कोणत्या?

१) महाराष्ट्राचे दैवत पंढरीचा विठ्ठल.

२) महाराष्ट्राचा ज्येष्ठ संतकवी ज्ञानेश्वर

३) महाराष्ट्राचे सांस्कृतिक व राजकीय दैवत शिवछत्रपती महाराज भोसले

१) विठ्ठल ही महाराष्ट्रीय आमजनांची व विशेषत: भाविक वारकऱ्यांची देवता. मूळची कर्नाटकी आहे. केवळ "कानडा हा विठ्ठलू, कर्नाटकू" या चरणाच्या आधारे हे ऐतिहासिक विधान केले जात नाही. विठ्ठल हा शब्द निश्चितच विठ्ठप्पा विठोबा या रीतीने व्युत्पन्न झाला आहे.

डॉ. रा. चिं. ढेरे यांचा "विठ्ठल : एक महासमन्वय" हा ग्रंथ मला वन्द्य आहे. विठ्ठल या निर्वचनाविषयी 'वि चा झाला ठोबा' यापासून ते कै. वि. कृ. श्रोत्रिय यांनी दै. सकाळच्या वाचकांचा पत्रव्यवहार या सदरात संस्कृत 'विष्टर' (आसन) या संभाव्य व्युत्पत्तीपर्यंत झाडून सर्व मतांची समीक्षा केली आहे. मात्र का कोणास ठाऊक कै. सर रा. गो. भांडारकर यांसारख्या प्राच्यविद्या महर्षींचे मत त्यांना फारसे रुचले नाही.

रा. गो. भांडारकर यांनी 'कृष्ण' यांचे कन्नडमध्ये 'किट्टप्पा' असे रूप होते, तसेच 'विष्णू' याचे 'विट्टप्पा' व पुढे 'विठोबा' असे तर्कमान्य व्हावे, असे निर्वचन दिले आहे.

विठ्ठल हा सर्वसामान्य कन्नडिगांप्रमाणे काळासावळा होता. एका सावळ्या मूर्तीने किती वेड हे लावावे? अशी भक्तीकविता फर्गसन महाविद्यालयाच्या एका विद्यार्थ्याने रचली व महाविद्यालयाच्या नियतकालिकात ती मुद्रित झाली. आजमितीस पंढरपूरच्या विठ्ठलमंदिरात कन्नड शिलालेख आढळतात.

खरे तर दक्षिणेकडचे दैवत शिव आहे. पण विठ्ठलात शैव वैष्णवाचा महासमन्वय आहे. हैद्राबादचे प्राच्यविद्या विशारद यांनी पंढरपूरच्या विठ्ठलाच्या मूर्तीच्या मस्तकावर शिवलिंग असल्याचे सिद्ध केले आहे (पहा श्री विठ्ठल दैवत : एक चिंतन).

नागपूरच्या कुलकर्णी वकिलांनी त्यांच्या 'धम्मपदा'च्या मराठी प्रस्तावनेत विठ्ठल हा मूळ बुद्धदेवता आहे, असा दावा केला आहे. नाही तरी हिंदूंनी विष्णूच्या दशावतारात बुद्धाची हजेरी लावली आहेच आणि जयदेवाने त्याच्या 'प्रीत गोविन्दकाव्यात' दशावतार वर्णनात "केशव, हे धृतबुद्धशरीर, जय जगदीश हरे" असे म्हटलेच आहे.

सूक्ष्मपणे पंढरीच्या विठ्ठलाची मूर्ती निरखून पाहता एक झिरझिरीत वस्त्र असलं- नसल्यासारखी ती नग्न मूर्ती आहे असेच आढळेल. दक्षिण भारतात दिगंबर जैनांची गोमेटश्वराची मूर्ती आढळते. लिंगायतांमध्ये (मुख्यत्वे दाक्षिणात्य) शिवलिंग यज्ञोपवितासारखे अंगावर बांधतात. आता बोला! विठ्ठल नेमका काय आहे? तो विट्टप्पा (कन्नड) आहे. मस्तकी शिवलिंगधारी मूर्तिरूप तो दिगंबर आहे आणि एका अर्थाने लिंगायतही. थोडक्यात, विष्णू (विट्टप्पा), बुद्ध, महावीर, लिंगायत या सर्वांचाच एक खरा खुरा 'महासमन्वय'.

पंढरी हे नावच दाक्षिणात्य आहे. आजही अनेक कन्नडिंग महिलांचे नाव पंढरीबाई आहे. कर्नाटकातूनही पंढरपूरला वारी --- मंदिरामधील मूर्तीची ठेवण (Pose) अनेक धर्तीची असते. भगवान विष्णूंची सरळ खडी मूर्तीही आढळते व शेषशायी स्वरूपातली आडवी निजलेली मूर्तीही आढळते. पण विट्टप्पा (विष्णुरूप) मानलेला विठ्ठल हा दोन्ही हात कमरेवर ठेवून समचरणांवर उभाच आढळतो.

विठ्ठल विष्णुरूप असल्याखेरीज त्याची सहचरी रुक्मिणी (रखुमाई) संभवत नाही. 'बाप रखुमा देवी वरू' ही ज्ञानेशांची 'मुद्रा' माझे दिगंवत स्नेही प्रा. श्रीरंग संगोराम (संघाराम) यांच्या मते, कन्नड पदावली बाप रखुमादेवी (य) अ) वरू. (पिता हा लक्ष्मीदेवीचा म्हणजेच पती) असा असावा. नाव पांडुरंग (श्वेतवर्ण) व प्रत्यक्ष 'कृष्णवर्णी या विरोधाभासाचा उलगडा कर्नाटकातील जैन संप्रदायातील कृष्णवर्णी व भूतीचे (भस्माचे) पांढरे पट्टे अंगावर धारण करणारे मुनी हा आदर्श असल्याने आहे.



अनुक्रमणिका

कर्नाटकातच हत्तींची निपज मुबलक. त्या कृष्णवर्णीय धिप्पाड प्राण्यावर भूतीचे पट्टे सजवले असायचे. (म्हैसूरच्या विजयादशमीच्या हत्तींची मिरवणूक पाहावी). कालिदासही 'भूतिमङ्गे कजस्य' याचा निर्देश करतो. त्यात पुन्हा विठ्ठल हा मूळचा वीरगळ (गळ कन्नड कल्ल- कल्लु म्ह. दगड) वीरकौराची मूर्ती अशीच 'हात कटीवर ठेवोनिया' या स्वरूपाची असते. पंढरपूरच्या विठ्ठलाची मूर्ती या मूलाकृतीनुसार असावी, असा अंदाज फ्रेंच अभ्यासक दलरी यांनी व्यक्तविला आहे. मूळ विठ्ठलाच्या मूर्तिकाराने वीरगळा कृतीवर बेतून त्यात शिवलिंगाची भर टाकली, असे मत प्रा. धनपलवार (कित्ता, पृ. ४) यांनी व्यक्त केले आहे.

प्रा. धनपलवारांची 'विठ्ठल म्हणजे शिव' (प्रकरण २), 'वैष्णवांच्या पंढरीची शैवपरंपरा' (प्रकरण ५), आंध्रातील विठ्ठल भक्तिधारा' (प्रकरण ७) व भट्टिप्रोलु येथील दोन शिलालेखविषयक दोन परिशिष्टे चिंतनीय व स्वीकरणीय आहेत.

२) आता वळू या महाराष्ट्रातील आद्य संतकवी समाधिस्थ ज्ञा. वि. कुलकर्णी अथवा सुप्रथित ज्ञानेश्वर/ ज्ञानदेव/ज्ञान'नाथ' यांच्याकडे.

मुळात अनेक महाराष्ट्रीय कुलकर्णी घराणी मूळ कर्नाटकातील. त्यात वडिलांचे नाव 'विठ्ठल'! माझे दोन मते सूत्ररूपात स्पष्टपणे नमूद करतो. याचा विस्तार माझ्या भावी पुस्तकात असेल. ही मते म्हणजे ज्ञानेश्वरीचे आकलन होण्यासाठी संस्कृत व कन्नड या भाषांचे आकलन आवश्यक आहे.

माझी स्नेही व ज्येष्ठ संशोधक बेळगावीचे रं. शा. लोकापूर यांचा सकस मूलगामी संशोधनाने खच्चून भरलेला ग्रंथराज "ज्ञानेश्वरकालीन मराठीवर कन्नडचा प्रभाव" याचे अनेकवार परिशीलन करावे. संशोधक मजकुरांनी 'हळेगन्नड' (जुने कन्नड पळगन्नडमं पोळगिडिसि पुराण कन्नड काहीसे 'बिघडवून' म्हणजे बदलून) ज्ञानेश्वरीत दाखल झालेल्या शेकडो शब्दांची चिकित्सा केली आहे.

पुण्यातील एका प्रथितयश प्रकाशकाच्या सल्ल्याला बळी पडून 'ज्ञानेश्वरीतील मऱ्हाटीवर' याऐवजी 'ज्ञानेश्वरकालीन मराठीवर' असा बदल ग्रंथनामात लेखक मजकुरांनी केला. तो मला पटत नाही. आज उपलब्ध असलेल्या तिपिटकातील भाषा ही ज्याप्रमाणे बुद्धाने वापरलेली जनभाषा नव्हे, त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरीतील 'मऱ्हाटी' ही ज्ञानेश्वरकालीन 'मराठी' नव्हे.

ज्ञानेश्वरांनी केवळ ज्ञानेश्वरीसाठीच खास एक 'भाव- कलात्मक भाषाशैली' वापरली आहे. ज्ञानेश्वरांच्या इतर लेखनाचे मराठी जवळजवळ आजच्या मराठीसारखेच असल्याने ज्ञानेश्वरांचे अभंग ('रूप पाहता लोचनी । सुख झाले हो साजणी'...), गवळण ('चंदनाची चोळी माझे अंग अंग जाळी) घोंगडी ('कान्हा- तुझी घोंगडी चांगली...') इत्यादी. लोकापुरांचे स्फूर्तिस्थान होते.

अ) भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या संशोधनपर लेखांच्या वार्षिकात १९३० साली श्रीमती शारदा आद्य रंगाचार्य (बंगळूर) यांनी लिहिलेला लेख Kanarese Influence on old Marathi with special reference to Jn a nesvari व आ) महाराष्ट्र साहित्य पत्रिका (ऑक्टो. १९३४ व जाने. १९३५ च्या अंकातून मुद्रित झालेले ज्ञानेश्वर पूर्वकालीन कानडी वाङ्मयाविषयीचे दि. द. रा. बेंद्रे यांचे दोन लेख.

कन्नड भाषा व साहित्य हे मराठी भाषा व साहित्यापेक्षा शतकांहून आधीचे आहे व एक वेळ 'कावेरीपासून गोदावरीपर्यंतच्या टापूवर कन्नड राजांचे अधिपत्य होते व जित्यांची भाषा जेते आत्मसात करतात (फारसी, मोगली- उर्दूने जवळजवळ सर्व भारतीय प्रांतीय भाषा प्रभावित झाल्या. तसेच आंग्ल भाषा पूर्ण भारताने आत्मसात केली - तद्वत!).

मी वयाच्या अठ्ठावन्नव्या वर्षी कन्नड भाषा शिकून प्रमाणपत्र परीक्षा उत्तम रीतीने 'पसार' झालो. लोकापुरांकडून स्फूर्ती घेऊन मी त्यांच्याही पुढे मजल मारायला सरसावलो, या सत्याची दखल लोकापुरांनी घेतली.

ज्ञानदेवीत एक ओवी आहे :

*विदळ बहू चोखा । मीनलीया वाला एका ।*

*कसु होए पांचिका । जियां परी ॥*

दि. वि. का. राजवाडे यांसारख्या मातब्बरांनेही स्पष्ट कबुली दिली की "या ओवीत 'हिणकस धातू' या अर्थाचा एक शब्द आहे, पण तो नेमका कोणता हे मला सांगता येत नाही." मी माझ्या कन्नडच्या गतीवर पुढे सरसावलो व तो शब्द 'विदळ' (पिदळ व प उदा. कवी कपी, अवमान, अपमान) म्हणजे 'पिदळ' (पित्तळ पितळ) हा आहे हे हेरले. हळेगन्नडमध्ये तमीळप्रमाणे 'प' होता. आधुनिक कन्नडमध्ये (व्हसागन्नडे) त्या हे 'चा 'प' वर्ण होतो. पण जानपद साहित्यात हा 'ह' वर्ण अजूनही आढळतो. एक स्त्री गाथा आहे.

*अत्तिगे तायल्ल, हित्तळे चिन्नल्ल ।*

*हेण्मकळिगे, हुट्टिदमने निजविल्ला ॥*

("भावजय कधी 'आई' होत नाही, पितळ काही सोने ठरत नाही. मुलीच्या जातीला तिचे जन्मघर स्वत:चे राहत नाही.") एखाद्याचे 'पितळ' उघडे पडण्यात वरचा सोन्याचा मुलामा गेल्यावर आतल्या त्याहून हिणकस धातू पितळ (संस्कृतात आरकू वा Bronze) उघडा होतो, हा आशय आहे. महाराष्ट्रावरील कन्नडचा प्रभाव ओसरू लागला तो १२९४ साली झालेल्या यादव 'सेऊण' (सं श्येन) राजघराण्याच्या पाडावामुळे.

जाता जाता दोन उपमुद्दे नोंदवणे आवश्यक मानतो. मराठीत यतिभंग हा दोष मानला जातो, तर द्राविडी भाषामध्ये (व त्यामुळे कन्नडमध्ये) यतिभंग हा 'अलङ्कार' मानला गेला आहे.

(पहा. शब्दमणिदर्पण J. S. Kulli. P. ३०५ 'यतिविलङ् अलङ्कार). ज्ञानेश्वरीत ठायी ठायी यतिभंग आढळतात. ओवी तर पूर्ण चरणांची नसून साडेतीन चरणांची असते: दाक्षिणात्य जगन्नाथ पंडित (पेरुभट्ट) याच्या गंगालहरीत ज्ञानेश्वरीप्रमाणेच यतिभंग अलङ्कार आढळतो.

अ) "निराधारो हा रो (दिमि) कथय केशामिह पुर:?"

आ) निरालम्बो लम्बो (दर) जननि... इत्यादी

इ) मराठीतील उत्कृष्ट विडम्बन कविता वाचावी.

"कवितेत जरी यतिभंग जमविले यमक किती (चांग) ले किती? चांगले किती?"

दुसरा उपमुद्दा हा की ज्ञानेश्वरीतील पसायदानावर "बौद्ध मतसंकेतू" जाणणाऱ्या ज्ञानेश्वरांवर पुण्यपरिणमन (पुण्य सङ्क्रमण करणे) याची दाट छाया आहे.

ज्ञानेश्वर अनेक कन्नडिगांप्रमाणे शुक्ल यजुर्वेदी शाखेचे असल्याने 'वौषट' याऐवजी 'वौखट' व्हावे त्याप्रमाणे पीयूषांचे याऐवजी 'पीयूखाचे' असे रूप येते. एकूण मराठीत 'विषारी'चे 'विखारी' असे रूप सामान्यपणे तभ्दवात आढळते. असो. समाधिस्थ कन्नड- मराठी कवी ज्ञानदेव विठ्ठलांना नम्र अभिवादन! माझी (खळाची) 'व्युङ्कटी' सांडो." व्यङ्कटरमणाला प्रार्थना.

३) आता महाराष्ट्राचे तिसरे दैवत स्वर्गस्थ अनंत कीर्ती श्री शिवछत्रपती महाराजांच्या कन्नड घराण्याकडे वळू.

आजवर भोसले हे कुल मूळचे रजपूत शिसोदिया मानले जात होते. रजपुतांचे (राजपुत्रांचे) उत्तम गुण महाराजांमध्ये नक्कीच आढळतात. पण भाषाशास्त्रदृष्ट्या शिसोदिया- भोसले हा बादरायण संबंध.

१९३२ सालीच बडोद्याच्या कै. ओगळे यांनी भोसले व कन्नडिग होय (ओय) सळ (सले) भोसला अनेक वचन 'भोसले' यांचे भाषिक नाते दाखवून दिले. वर्तमानात वाग्वैद्य रा. चिं. ढेरे यांनी या मतास न्याय्य रीतीने उचलून धरले. मी या दोन महान संशोधकांचेच मार्गानुसरण करू इच्छितो.

मूळचे होयसळ असणारे भोसले कर्नाटकातील. आजमितीसही पिताश्री शहाजी महाराजांची समाधी कर्नाटकात बंगळूरजवळ स्थित आहे.

व्यंकोजी तंजाऊरला स्थायिक झाले. आजच्या तंजाउरी मराठीवर कन्नडचा प्रभाव आहे. तेथील महिला म्हणते : "त्यांचे अंग बरे नाही म्हणून आले नाहीत" (अवरिगे मैसरि इल्ल आदरिन्स बन्दिल्ले) : --- महाभारतात मैय पसितु (अंगाची भूक) असा प्रयोग आहे. कर्नाटक व महाराष्ट्रात महिला 'स्नान' करीत नाहीत तर 'अंग ओले' करतात व पुरुषही "अंग + ओले- ळे" करतात ('अंघोळ' करतात. गनिमी काव्याचा ('कावा'

याचा काव्याचा म्हणजे कवितेचा नाही. नाही तर The British conquerred the Indians by 'Poetry' व्हायचे इति वाग्वैद्य प्रमोद तलगेरी.)

माझी मनापासून इच्छा आहे की एवढे ऐतिहासिक लागेबांधे असणारे कर्नाटक व महाराष्ट्र यांच्यात 'कन्नडवादे बेळगावची उडे लालमाती' हा धुराळा सामंजस्याने शमावा.

याबाबत 'भिजत घोंगडं' न ठेवता केंद्र शासनाने सलोखा- चतुर अशा माननीय खासदार व केंद्रीय कृषिमंत्री शरदरावजी पवार यांसारख्या धुरंधर नेत्याच्या अध्यक्षत्वाने एक समिती नेमून हा वाद संपवावा. शरदरावजी 'जोडणारे' पुढारी आहेत, 'तोडणारे' नाहीत.

'नामान्तर न करता 'नामविस्तार' करून (डॉ. आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ) त्यांनी मुत्सद्दीपणे एक मोठा वाद 'संपुष्टात' आणला. सुज्ञ वाचकहो, मध्वाचार्यांच्या काळात या संप्रदायात देव 'संपुष्ट' नावाच्या तांब्यातल्या पेटीत ठेवले जायचे व पूजेच्या वेळीच केवळ बाहेर काढले जायचे.

पूजा 'संपली' की देव 'संपुष्टा'त जायचे. या वाक्प्रचारासारखाच 'बेळगावी कन्नडसक्ती' हा विषय कायमचा संपुष्टात जावा, ही प्रामाणिक इच्छा. थोडक्यात काय तर भाषासक्ती (कन्नडची बेळगावमध्ये) व भाषा आसकवी प्रस्तुत लेखकाची महाराष्ट्रात या दोन भिन्न बाबी आहेत.

◇◇◇

**प्रा. वाग्वैद्य. मो. गो. धडफळे**

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
## घटनादुरुस्तीसमितीचे आवाहन

महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या घटनादुरुस्ती-समितीतर्फे निवेदन देण्यात येत आहे की, कालमानाप्रमाणे घटनादुरुस्ती व्हावी म्हणून सर्व सभासदांकडून सूचना मागविल्या होत्या. मागील समिती-निमंत्रक श्री. रत्नाकर कुलकर्णी, विश्वस्त राजा फडणीस आणि कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे यांनी सदर सूचनांच्या आधारे एक कच्चा मसुदा तयार केला होता. त्यानंतर कार्यकारी मंडळाची मुदत संपल्याने ते पूर्ण करण्याचे काम विद्यमान समितीने हाती घेतले आहे. अद्यापही सभासदांना काही सूचना/दुरुस्त्या कळवावयाच्या असतील, तर जानेवारी २०१३ अखेरपर्यंत पोहोचतील अशा बेताने पाठवाव्यात. घटना-दुरुस्तीला अंतिम स्वरूप देण्याचे काम विद्यमान समितीला लवकरात लवकर पूर्ण करून पुढील अंकात (मार्च २०१३) अंतिम प्रारूप जाहीर करावयाचे आहे.

**डॉ. माधवी वैद्य**
कार्याध्यक्ष

**प्रा. मिलिंद जोशी**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**
निमंत्रक
घटना-दुरुस्ती समिती
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

**समिती सदस्य** – प्रभाकर संत (ठाणे), राजेंद्र मुठाणे (इचलकरंजी), पां. के. दातार (ठाणे), ॲड. जे. जे. कुलकर्णी (सोलापूर), कल्याणी दिवेकर (पुणे)



अनुक्रमणिका



# 'मराठवाड्यातील संतमहंत' - प्रा. भगवान काळे

– डॉ. सौ. शोभा घोलप

*नाथ, दत्त, भागवत-वारकरी संप्रदाय, समर्थ संप्रदाय, महानुभव संप्रदाय ह्यांनी आपले वैचारिक वेगळेपण दाखविताना भक्तीच्याच वेगवेगळ्या वाटा दाखविल्या. 'साधु दिसती वेगळाले । परी ते स्वरुपी मिळाले ।।' असेच त्यांचे वेगळेपण सर्वमान्य आहे. ईश्वरी तत्त्वाचा परिचय, सर्वसामान्यांना कळेल अशा रीतीने सांगणारी आणि 'महासमन्वय' साधणारी ती एक व्यापक चळवळ होती. एक विविध अंगे असलेली ईश्वरी-तत्त्वाची व्यवस्था होती. अध्वर्युंनी आपापल्या परीने ती समाजजीवनात रुजविण्याचा प्रयत्न केला. ह्या महासमन्वयाच्या प्रवासातील बरेच कोपरे अंधारे आहेत. ते शोधणे काही अप्रकाशित व्यक्ती प्रकाशात आणणे. त्यांचा अनुबंध जोडणे. हेच संतसाहित्याचा अभ्यासकांचे खरे काम आहे. डॉ. शोभा घोलप यांनी हा सुप्त अनुबंध ह्या पुस्तकपरीक्षणाच्या निमित्ताने स्पष्ट केला आहे. – संपादक*

संत वाङ्मयाचे व्यासंगी अभ्यासक प्रा. भगवान काळे यांचा 'मराठवाड्यातील संतमहंत' हा ग्रंथ म्हणजे मराठवाड्यातील संतपरिवाराचा अभ्यासपूर्वक परिचय करून दिला आहे. यातील काहींचा फारसा अभ्यास झालेला नाही, हे लक्षात घेता, प्रस्तुत अभ्यासविषयाचे महत्त्व सहज पटावे.

महाराष्ट्र ही संतांची भूमी आहे. समाजप्रबोधन आणि संस्कृत साहित्यातील ज्ञानभांडार मराठीत आणणे, ही संतांची भावना होती. संतसाहित्याने समाजाला आत्मभान दिले. लेखक महाशयांनी यासाठी ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास यांच्या काव्यातील दाखलेही दिले आहेत.

'ज्ञानदेव : वारकरी पंथाचे आद्यप्रवर्तक' या लेखात ज्ञानदेव यांच्या ठिकाणी दोन संप्रदाय एकवटलेले दिसतात, हा विचार मांडला गेला आहे.

एकनाथ संप्रदाय आणि दुसरा भागवत किंवा वारकरी संप्रदाय. वारकरी ज्ञानदेव गुरुपरंपरेने नाथ संप्रदायी होते. यासाठी बहिणाबाईचा पुढील अभंग महत्त्वाचा वाटतो. आपली गुरुपरंपरा सांगताना त्या थेट ज्ञानदेवांपर्यंत जातात.

*"आदिनाथे उपदेश पार्वतीस केला ।*
*मच्छिंद्रे ऐकिला मंछगर्भी ।।*
*शिवहृदयींचा मंत्र पै अगाध ।*
*जालासे प्रसिद्ध भक्तियोगे ।।*
*त्याने त्या गोरक्षा केले कृपादान ।*
*तेथोनि प्रगट जाण गहेनि प्रती ।।*
*गहेनिने दया केली निवृत्तिनाथा ।*
*बाळपण असता योगरूप ।।*
*तेथोनि ज्ञानेश पावले प्रसाद ।*
*जाले ते प्रसिद्ध सिद्धासनी ।।*
*सच्चिदानंद बावा भक्तीचा आगर ।*
*त्यासी अभयवर ज्ञाने केला ।।*
*पुढे विश्वंभरभट शिवरूप सुंदर ।*
*तेणे राघवी विचार ठेविलासे ।।*
*केशव चैतन्य बाबाजी चैतन्य ।*
*जालेसे प्रसन्न तुकोबासी ।।*
*एकनिष्ठ भाव तुकोबाचे चरणी ।*
*म्हणोनि बहेणि लाधलीसे ।।*

याच लेखात आणखी एक विचार मांडला आहे. तो म्हणजे 'ब्रह्मी ब्रह्म होणे' (पृ. २८) 'ब्रह्मी ब्रह्म होणे' हे फुकाचे नसून पूर्वजन्माचे सुकृत. या जन्मातील कमाई व गुरुकृपा. या तिहींचा संयोग होईल तरच ब्रह्मसंग घडेल. असे ज्ञानदेव स्पष्टपणे सांगतात. हा विचार अतिशय चिंतनीय आहे.

अशी विधाने म्हणजे लेखक महाशयांच्या साक्षेपी



अनुक्रमणिका



दृष्टीची साक्ष म्हणता येईल. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी, हरिपाठ, योगवासिष्ठ असे अनेक ग्रंथ, शेकडो अभंग, विराण्या हेच ज्ञानदेवांचे मोठे योगदान आहे. तिसऱ्या लेखातील गोरोबांची विठ्ठलभक्ती अवर्णनीय आहे.

आद्यकवी मुकुंदराज आणि 'विवेकसिंधु' यावर लेखक महाशयांनी सखोल चर्चा करून काही प्रश्नही उपस्थित केले आहेत.

*"शके अकरा दाहोत्तरु । साधारण संवत्सरु ॥*
*राजा शारंगधरु । राज्य करी ॥"*

त्यांच्या मते साधारण संवत्सर त्या वर्षी नव्हते. दुसरे जयत्पाळ हा राजा नसून शारंगधर राजा होता. (पृ. क्र. ३७)

मात्र इतिहासात अशी नोंद दिसते की, 'जोगाईच्या आंब्याचा राजा 'जयंतपाळ' याच्यासाठी विवेकसिंधु हा ग्रंथ मुकुंदराजांनी लिहिला.' विवेकसिंधुच्या पूर्वार्धात शेवटी पुढीलप्रमाणे ओव्या आहेत.

*"नृसिंहाचा बल्लाळ । तयाचा कुमर जयंतपाळ ॥*
*तेणे करविला गदारोळ । ग्रंथ रचनेचा ॥*
*भगिरथाचे दैवयोगे । विश्व सुस्नात गंगे ॥*
*तैसे जयंतपाळाचेनि प्रसंगे । जग सुखिया होय ॥"*

(म. वा. इ. खंड १ ला, पृ. २७३)

यावरून जयत्पाळ हाच राजा असावा असा तर्क करता येतो. लेखक महाशयांच्या मते मुकंदराजाने संस्कृत भाषेत विवेकसिंधु हा ग्रंथ लिहिला असून त्याचे भाषांतर कुणीतरी मराठीत केले असावे. त्यामुळे भाषा अर्वाचीन वांटते. त्यासाठी त्यांनी एक ओवीही दिली आहे..

*"स्वप्नी नाही तेचि दिले ।*
*परि निद्रिस्तासी साच भासे ॥*
*तैसे नाशवंत परि भासे । अज्ञान जनासी ॥*

*(विवेकसिंधु)*

वरील ओवीची भाषा खरोखर अर्वाचीन आहे. तरीही या बाबतीत विचार व्हावयास हवा असे वाटते. कारण ल. रा. पांगारकरांच्याच ग्रंथात पुढील उतारा सापडतो - "कोणतेही ज्ञानाचे बोलणे मराठीसारख्या देशी भाषेतून करण्याची तेव्हा रूढीच नव्हती. अशा स्थितीत ११ व्या शतकाच्या पूर्वार्धात (१०३९ चे सुमारास) श्रीपदी भट्टाने 'ज्योतिष रत्नमाला' हा शास्त्रीय विषयावरचा प्रबंध मराठीत लिहिला आणि त्यानंतर सुमारे दीडशे (१५०) वर्षांनी मुकुंदराजांनी शांकरवेदान्ताचे विवेचन करणारा 'विवेकसिंधु'हा प्रौढ तात्त्विक ग्रंथ मराठीतूनच लिहिला. अर्थात हे तत्कालीन समाजास मान्य नव्हते.

*"वेदशास्त्राचा मतितार्थु । मऱ्हाटिया जोडे फलितार्थु ॥*
*तरी चतुरीं परमार्थु । का नेघावा? ॥"*

(विवेकसिंधु १.१२)

असा थोडासा आर्जवी उद्गार यामुळेच मुकुंदराजांना काढावा लागला असावा. उपनिषदाचाच अभिप्राय आपण मराठी भाषेतून सांगत आहोत इतकेच. असे स्पष्टीकरण करणे त्यांना भाग पडले असावे." (म. वा. इ. खंड १, पृ. ४६) यावरूनही 'विवेकसिंधु' हा ग्रंथ मुकुंदराजांनी मराठीतच लिहिला असावा असे म्हणता येते. पुढे कोणीतरी त्याचेही सोप्या मराठीत भाषांतर केले असावे. 'विवेकसिंधुची भाषा' हा खरा संशोधनाचा विषय आहे, हे लेखक महाशयांचे म्हणणे मान्य करून त्यांनी संशोधकांना, अभ्यासकांना 'कवी मुकुंदराज स्वामी' या लेखातून अनेक प्रश्न उपस्थित करून संशोधनासाठी नवे दालन खुले केले आहे.

प्रपंचात राहून परमार्थाचा अनुभव कसा घ्यायचा, याचे उदाहरण एकनाथांनी घालून दिले. भक्तीतील पावनत्वाची शक्ती प्रत्यक्ष कीर्तनात अवतरते, म्हणून एकनाथ महाराजांच्या लेखी कीर्तनाला महत्त्व आहे. नाथांनीच वारकरी- कीर्तन समाजमानसात रुजविले. एकनाथांच्या चरित्राचा आढावा खूप काही सांगून जातो. 'सर्वांभूती भगवद्भाव' हे त्यांच्या चरित्राचे आणि कवित्वाचे सूत्रवाक्य आहे. 'नरहरी सोनार' व्यवसायालाच परमेश्वर मानणारे शिवभक्त. 'संत नामदेव' चरित्राबरोबरच उत्तर भारतातील रामानंद, कबीर, नानक, द्वैदास इत्यादी संतांनी आपल्या अभंगात नामदेवांचा गौरवाने उल्लेख



अनुक्रमणिका

केला आहे. पंजाबातील बहुतेक शिंपी नामदेव संप्रदायी आहेत, हे विशेष. लेखक महाशय मुक्ताईला 'एक सौदामिनी' संबोधतात. त्या योगमार्गातही निष्णात होत्या. ज्ञानेश्वरांसारखा भाऊ आणि मुक्ताईसारखी बहीण, असा बहीण-भावंडांसारखा जोडा वाङ्मयाच्या इतिहासात दुसरा नाही. निराश झालेल्या भावाची समजूत काढताना -

'विश्व रागे झाले वन्ही । संत सुखे व्हावे पाणी ॥'

जर विश्व अग्नीसारखे असेल तर त्याला शांत करणारे पाणी आपण व्हावे, असे समजावणारी मुक्ताबाई खरोखरच 'सौदामिनी' होती. जनाबाईचे चरित्र आणि तिचे अभंग अंतर्मुख करविणारे आहेत.

समर्थ आणि सर्वधर्मसमभाव हे एक समीकरणच आहे. त्यांचे विचार, त्यांचे तत्त्वज्ञान आजच्या काळात आचरणात आणणे किती गरजेचे आहे, हे आपण जाणतोच. समर्थांच्या चरित्रातून लेखक महाशयांनी हे अधिक स्पष्टपणे मांडले आहे. 'वामन पंडित' हे आख्यानक कवी म्हणून ओळखले जातात. स्वभावोक्तीपूर्ण वर्णन हे वामन पंडितांचे वैशिष्ट्य आहे. महाकवी 'मुक्तेश्वरां'संबंधी फारशी विश्वसनीय सविस्तर माहिती आज उपलब्ध नाही' (पृ. १०७) मात्र ल. रा. पांगारकर यांच्या म. वा. इ. खंड २, यात त्यांचे सविस्तर चरित्र आलेले दिसते. (पृ. ३५१) त्यांचे आडनाव मुद्गल होते, हेही बरोबर पण 'मुक्तेश्वर हा गोदाबाईचा मुलगा जन्मत: मुका होता, हा उल्लेख मात्र चरित्रात कुठे वाचावयास मिळाला नाही. काव्यादर्शकार 'दंडी' यांनी त्यांचे वर्णन करताना मुक्तेश्वरांची वाणी सुरुचिरा आहे, गुणग्राहिणी आहे. असाही उल्लेख आढळतो (पृ. १५३) मग कदाचित् ही सुरुचिरा वाणी लेखकांच्या म्हणण्यानुसार नाथांच्या कृपादृष्टीनंतर आली असावी.

योगिनी बहिणाबाई या खरोखरच ज्ञानवती, महायोगिनी होत्या. विवाहाच्या वेळी त्या नऊ वर्षांच्या नसून तीन वर्षांच्या होत्या. (शालिनी जावडेकर गाथा पृ. ८) त्यांचे 'निर्याणपर अभंग' आणि 'ब्रह्मकर्मपर अभंग' यावरूनच त्या ज्ञानवती महायोगिनी होत्या हे कळून येते. निर्याणपर अभंगात त्यांनी त्यांच्या तेरा पूर्वजन्मांचे यथातथ्य वर्णन केले आहे, तर ब्रह्मकर्मपर अभंगात 'वज्रसूचिकोपनिषदा'चा अनुवाद करून खरा ब्राह्मण कोण? यावर प्रकाश टाकला आहे. कारण 'वज्रसूचिकोपनिषद' हे जन्मजात ब्राह्मण्यावर कठोर आघात करणारे उपनिषद आहे.

दासोपंत हे दत्ताचे एकांतिक भक्त आणि एकनाथांपेक्षा लहान; पण त्यांचे समकालीन. 'महाराष्ट्र शारदेचा कुबेर' असा जो त्यांचा गौरव केला आहे तो योग्यच आहे. त्यांचा 'अफाट कवितासमुद्र' आणि 'दासोपंतांची पासोडी' याची साक्ष आहे. पण लेखक महाशय म्हणतात त्याप्रमाणे दुर्दैवाने संशोधक, अभ्यासक त्याकडे फारसे वळलेले दिसत नाहीत. त्यांच्यासाठी खरोखर ही एक संधी आहे. धुंडामहाराज देगलूरकर यांचे एकंदर वाङ्मय पाहता ते वारकरी संप्रदायाचे चालते बोलते विद्यापीठ होते, हे म्हणणे किती यथार्थ आहे हे पटते. श्री साईबाबा हे तर आज आपल्यात नसूनही प्रत्येक क्षणी ते आपल्याबरोबर आहेत, अशी अनेकांची भावना आहे. यातच या थोर सत्पुरुषाचे महत्त्व पटते. त्यांची 'श्रद्धा आणि सबूरी' या मंत्राची आजच्या काळात फार गरज आहे.

'कबीराचा शेखा' म्हणून गौरविलेले शेख महंमद यांनी त्यांच्या 'योगसंग्राम' या ग्रंथात पुढील वर्णन केले आहे.

*"राजे सांडतील परमार्थ धर्मनीती ।*
*पर्जन्यकाळी पिके सांडवेल क्षिती ॥*
*आचार भ्रष्टोन अठरा पगड जाती ।*
*एकवट जेविती परियेसा ॥*
*कर्म चांडाळाची होईल मान्यता ।*
*हरिभक्तास पाहो न शकती तत्त्वता ॥"*

वरील अभंगाची आजही प्रचीती येत आहे. धर्मापासून, तत्त्वांपासून मूल्यांपासून माणूस दूर जात असून सर्वत्र अनाचार वाढतो आहे. मूल्य पायदळी तुडविणाऱ्यांची प्रतिष्ठा वाढते आहे. अशा संतांच्या अभ्यासाचीही आज गरज आहे.

चक्रधरस्वामी, नागांबिका पैठणकर, श्री नागदेवाचार्य, महदाईसा (महदंबा) जनार्दनपंत उपाध्ये, कमळाईसा उपाध्ये, केशीराज व्यास, हिराईसा पाथरीकर, ॐकार व्यास धाराशिवकर, मालोव्यास उपाध्ये, ॐकारमुनी चोरमागे, शहामुनी, महापंडित गुणाढ्य, हरिवरदा, गागाभट्ट तुकाविप्र महाराज, जनार्दनस्वामी, गुरुगोविंदसिंह, दादामहाराज चातुर्मासे, उद्धव चित्‌घन, दत्तनाथ उज्जनीकर, विठ्ठलशास्त्री चाकुलेकर, लक्ष्मण महाराज, गोचरस्वामी, यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे, रंगनाथस्वामी निगडीकर, पाचलेगावकर महाराज, यशवंत महाराज जालनापूरकर, रामी रामदास या सर्वांच्या चरित्रावरून आणि काव्यावरून त्यांचे मोठेपण, त्यांची आध्यात्मिक, सामाजिक भूमिका लक्षात येते. पण या सर्व लेखांवर अधिक सविस्तर चर्चा झाली असती तर बरे झाले असते.

अशी ही आभाळाला गवसणी घालणारी, एवढी मोठी माणसे, काहीशी दुर्लक्षित होती. त्यावर प्रकाश टाकून वाचकांसमोर आणण्याचे खूप मोठे काम लेखक महाशयांनी केले आहे. अनेक ग्रंथ ज्ञानसाधनेचे असतात. परंतु संतांवरील ग्रंथांचे वैशिष्ट्य हे की या ग्रंथांमुळे ज्ञानाचा लाभ तर होतोच; पण त्याबरोबरच जीवनाचा अनुबंध कळावयास लागतो. परमार्थ मार्ग आणि कवित्व अशा दोन्ही दृष्टिकोनातून लेखक महाशयांनी एकूण ४८ संत- महंतांचा परिचय करून दिला आहे; तो अतिशय महत्त्वपूर्ण आहे. उपासक आणि अभ्यासक अशा सर्वांनाच या संत-महंतांचे दर्शन आवडेल, उद्बोधक ठरेल, असा विश्वास वाटतो.

◇◇◇

**डॉ. सौ. शोभा घोलप**
७५९/६६, दत्त अपार्टमेंट,
प्रभात रोड, पुणे - ४११००४
दूरभाष : २५४६१०८२
भ्रमणभाष : ९८२३०६४७३२

---

**नवीन आजीव सभासद**

आंगळे रमेश वामनराव, बदलापूर
जोशी रोहिणी शामसुंदर, बदलापूर
मेढी स्मिता प्रकाश, पुणे
जोशी सायली अमित, पुणे
प्रभुणे रामकृष्ण गोविंद, कराड
बांगड प्रशांत, कानपूर
राऊत जितेंद्र चंद्रकांत, पुणे
कोडोलीकर दत्तकुमार श्रीपाद, पुणे
पायगुडे भाग्यश्री मारुती, पुणे
सोसे अतीश सुरेश, पुणे
तांबोळी संतोष व्यंकटेश, पुणे
कुलकर्णी लक्ष्मण गंगाधर, पुणे
बोलदे सरोज अशोक, सोलापूर
पात्रे दत्तात्रय माधवशा, सोलापूर
रच्या चंद्रकांत सुदर्शन, सोलापूर
कोणसिरसगी अरविंद सदाशिव, सोलापूर
कोरे संजय अण्णाराव, सोलापूर
माळू कल्पेशा गौतमराव, सोलापूर
कोरे सुस्मिता संजय, सोलापूर
अंदेली अनुप्रीमा महेश, सोलापूर
बापट प्रणव अजय, पुणे
गिरासे जितेंद्र
कुलकर्णी रवींद्र मुकुंद
मेस्त्री सौतारा अशोक
भदाणे सतिश दत्तात्रय
परांजपे कमल वि., पुणे
म्हेत्रे पांडुरंग संतोष, पुणे
पाटेकर प्राची हेमंत, लोणावळा
भोंडवे अविनाश विनायक, पुणे
महाजन छाया भवान, औरंगाबाद
नगरकर विजय प्रभाकर,
देशपांडे आनंद राजाराम, परभणी
विभुते,
गोडसे माणिकराव विठ्ठल, देवलाली
शिंदे प्रमिला प्रभाकर, नाशिक
तासकसकर रमेश वसंत, नाशिक
पवार दिलीप पुंडलीक
रिसबुड सुधा रत्नाकर, पुणे
कानडे राजकुमार रेवणप्पा, पुणे
गायकवाड बेबीताई अशोक, अ.नगर
कोळी नामदेव माधव
धनगर गोपीचंद देवीदास
धनगर धनराज तोताराम
पाटील महेंद्र भास्करराव
सोनार मोरेश्वर पुरुषोत्तम
पाटील योगेश भास्कर
महाले योगेश दिसमणे
बोराटे सोपान बापूराव
थोरात संग्राम गोपीनाथ
शाळीग्राम करंके छबिलदास, धुळे
पाटील रवींद्र डोंगर, नंदुरबार
गडकर श्रीराम यशवंत
दीक्षित श्रीकृष्ण माधव, पुणे
म्हेत्रे विनायक ज्ञानदेव, पुणे
उपाध्य अस्मिता अनिल, पुणे
माडगुळकर श्रीधर गजानन, पुणे
माडगुळकर शीतल श्रीधर, पुणे
कर्वे अभिजित अरविंद, पुणे
ओव्हळ मधुश्री दिलीप, सांगवी
सोनावणे चंद्रहास बाबुराव, निगडी



अनुक्रमणिका

# उत्पातांचा लावणी इतिहास : अभ्यासाचे एक अपरिचित दालन



– डॉ. विद्याधर सीताराम करंदीकर

*लावण्य प्रकटविणारी ती 'लावणी'! उत्पात घराण्याने भक्तीसौंदर्य हा लावणीचा पाया मानला आणि अलौकिक-अशरीरी शृंगाररसातून भक्तीच्या चळवळीस हातभार लावला. रुक्मिणीने कृष्णाला लिहिलेली 'प्रणयपत्रिका' कृष्णापर्यंत पोहोचविणारा सुदेव ब्राह्मण 'उत्पात'च होता, म्हणून शृंगारकवितेची आराधना या घराण्यात आली असावी हा बादरायणसंबंध आहे. कारण सुदेवाने ती पत्रिका वाचलीही नव्हती. उत्पातांच्या सुसंस्कारित आणि उत्स्फूर्त शब्दकळेचे वेगळेपण आणि लावणी-आविष्कार, ज्ञानोबा उत्पातांच्या लावणीतूनच शोधायला हवा. कलावंताची ही शब्द साधना अनवट वाटेने कशी गेली, ते शाहीर राम जोशी यांच्या फटक्यात आणि होनाजी बाळाच्या अमरभूपाळीत, पहायला मिळते. शारीर सौंदर्याकडून आत्मिक-अशरीरी सौंदर्याचा प्रवास उत्पातांच्या तीन पिढ्यांच्या कलासाधनेचा इतिहास लक्षणीय आहे.* – *संपादक*

अत्यंत मोजके कार्यक्रम होऊनही ज्या प्रयोगाला मोठी प्रतिष्ठा लाभली असा 'लावणीतील भक्तिदर्शन' हा एक महत्त्वाचा मंचीय प्रयोग होता. या प्रयोगामुळे 'ज्ञानोबा उत्पात' हे नाव सर्वतोमुखी झाले. मूळच्या प्रसिद्धीपराङ्मुख ज्ञानोबांना प्रकाशात आणण्याचे काम पं. भीमसेन जोशी आणि पु. ल. देशपांडे या साधक कलाश्रेष्ठांनी केले. आजही या प्रयोगाच्या आणि ज्ञानोबांच्या आठवणी रसिकांच्या चर्चेत असतात.

'ज्ञानोबा उत्पात' हे ठळक नाव आपल्यासमोर प्रकर्षाने आलेले असले तरी त्यांच्यामागे लावणी गायनाची काही पिढ्यांची परंपरा होती. स्वत: 'लावणी' हा रचनाप्रकार किमान नाथकालीन आणि तत्पूर्वीही दीड-दोन शतके अस्तित्वात असलेला असा होता. वर्गीकरण करता येईल एवढे वैविध्य या रचनाप्रकारात होते. लावणीच्या आकृतिबंधाविषयी काही संशोधन पूर्वी झालेले असले, तरी या रचनाप्रकाराविषयीची विस्तृत माहिती एकत्रितपणे सामान्य वाचकांसमोर येणे आवश्यक होते. उत्पात घराण्यातील लावणी परंपरा व 'लावणीतीत भक्तिदर्शन' या प्रयोगाविषयीचे तपशीलही वाचकांना उपलब्ध होणे गरजेचे होते. ही गरज लक्षात घेऊन, या कार्यक्रमात निवेदकाच्या रूपात सहभागी असलेले श्री. वसंतराव उत्पात यांनी 'उत्पातांचा लावणी इतिहास' हे पुस्तक लिहिले आहे. ललितकलांच्या अभ्यासकांना एक काहीसे अपरिचित दालन या पुस्तकामुळे खुले झाले आहे.माध्यमिक शिक्षक म्हणून तीस वर्षे उत्तम कामगिरी करून सेवानिवृत्त झालेल्या वसंतराव उत्पातांचा मन:पिंड निरंतर अभ्यासकाचा आहे. 'मराठी भाषासौष्ठव', 'संस्कृत साहित्य परिचय', 'मराठीचे मूळ व्याकरण' इत्यादी पुस्तकांमधून त्यांच्या अभ्यासाचा प्रत्यय येतो. त्यांचे लेखन तात्कालिक लोकप्रियतेसाठी केलेले नाही. अभ्यासकांच्या पुढच्या पिढ्यांसाठी पथदर्शक असे हे लेखन आहे.

कै. ज्ञानोबा उत्पातांनी 'मराठी पारंपरिक लावणी' हे पुस्तक स्वत: संपादित केलेले होते, पण त्यात काही त्रुटी राहून गेल्याची रुखरुख त्यांना लागून राहिली होती. उत्पातांच्या लावणी इतिहासावर सांगोपांग विचार करणारे पुस्तक वसंतरावांनी लिहावे, अशी ज्ञानोबांची सूचना होती. ज्ञानोबा आणि वसंतरावांचे बंधू वा. भ. उत्पात यांनी सर्व सहकार्यही वसंतरावांना देऊ केलेले होते. मात्र एका अकल्पित विधिलिखितानुसार ज्ञानोबा आणि वा. भ. उत्पात यांचे निधन २० जुलै २००६ या एकाच दिवशी झाले आणि वसंतरावांवर एक हाती हे पुस्तक पूर्ण करण्याची जबाबदारी आली. ही जबाबारी वसंतरावांनी सर्व सामर्थ्यानिशी पूर्ण केली







आहे; याचे प्रत्यंतर 'उत्पातांचा लावणी इतिहास' वाचताना प्रत्येक पृष्ठागणिक येते.

पुस्तकातील पहिले प्रकरण 'लावणीविषयी थोडेसे' या शीर्षकाचे असले तरी त्याचे स्वरूप 'लावणीविषयी पुष्कळसे' असे आहे. आज मन्मय शिवलिंग (१५६०-१६१३) या कवीची लावणी; उपलब्ध असलेली सर्वांत जुनी लावणी मानली जात असली तरी त्याच्या खूप पूर्वीच्या अज्ञानसिद्धाने आणि त्याचे गुरू नागनाथ-नागेश यांनी तेराव्या शतकात लावणीचे पूर्वरूप लिहिले होते, ही माहिती या प्रकरणातून मिळते. लावणीची व्याप्ती, तिचे स्वरूप, तिच्यातील संगीत, 'लावणी' या शब्दाची व्युत्पत्ती, लावणीची वैशिष्ट्ये, तिच्या सादरणीकरणाचे स्वरूप, लावण्यांचे प्रकार अशा अनेकांगी, मुद्देसूद विवेचनामुळे हे प्रकरण समृद्ध बनले आहे.

'उत्पात समाजाचा इतिहास' हे केवळ दहा पृष्ठांचे दुसरे प्रकरण उत्पात घराण्याची कलासाधना कोणत्या मुशीतून घडली, त्याची संसूचना देणारे आहे. रुक्मिणीने कृष्णाला पाठविलेले प्रेमपत्र ज्या सुदेव ब्राह्मणाच्या हाती तिने पाठविले, त्या सुदेव ब्राह्मणाचे 'उत्पात' हे वंशज आहेत. एका दिव्य प्रणयाचे साक्षीदार असणाऱ्या उत्पातांना लावणीसारख्या सशक्त शृंगारकवितेची आराधना करणे औचित्याचे ठरते. ही पुण्याई पुढच्या अनेक पिढ्यांना पुरेल, यात शंका नाही.

'उत्पात घराण्यातील लावणी गायकांची परंपरा' या तिसऱ्या प्रकरणात तीन पिढ्यांची कलासाधना अंतर्भूत आहे. कै. बाळकोबा यांच्यापासून ज्ञात असणारी ही परंपरा भगवान गोपाळ तथा दादबा व ज्ञानेश्वर गोपाळ तथा ज्ञानोबा उत्पात यांनी पुढे नेली. (लावणीतील भक्तिदर्शनामुळे प्रसिद्ध झालेले ज्ञानेश्वर विठ्ठल तथा ज्ञानोबा उत्पात त्यापुढच्या पिढीतील आहेत. नामसाधर्म्यामुळे या दोन ज्ञानोबांविषयी संभ्रम निर्माण होतो.) मच्छिंद्र गणेश उत्पात, पिलोबा ऐतवाडकर, रामचंद्र कृष्णाजी व वामन रामचंद्र उत्पात, शंकराप्पा मंगळवेढेकर, रंगाप्पा उत्पात, लावणीसम्राज्ञी गोदावरी पुणेकर आधीच्या पिढीतील साधकांनंतर ज्ञानोबा (द्वितीय) व त्यांच्या नंतरच्या पिढीतील कलावंतांच्या साधनेचा परिचय या प्रकरणातून घडतो. प्रापंचिक जबाबदाऱ्या न टाळता ही अव्वल श्रेणीची कलासाधना कशी करता येते, याचे ज्ञानोबा (द्वितीय) हे अनुकरणीय उदाहरण आहे.

'लावणीतील भक्तिदर्शन'साठीचे एक स्वतंत्र प्रकरणच या पुस्तकात आहे. या कार्यक्रमाने यशाचे आणि लोकप्रियतेचे मापदंड प्रस्थापित केलेले आहेत. या कार्यक्रमाची वसंतरावांनी केलेली संहिता सारांशरूपात या प्रकरणामध्ये समाविष्ट आहे. या संहितेतल्या प्रत्येक शब्दाविषयी विचार करीत ही संहिता वाचली गेली पाहिजे. कार्यक्रमाची संहिता कशी असावी, याचा तो वस्तुपाठ आहे.

काही अभिप्राय, कार्यक्रमाच्या वेळी घडलेले किस्से यांविषयीची दुय्यम श्रेणीची प्रकरणे पुस्तकात आहेत. सौ. शैला दातार यांचा अभिप्राय नोंदविण्यासारखा आहे हे खरे, परंतु पुस्तकाच्या पुढच्या आवृत्तीत या प्रकरणांचा संक्षेप करणे इष्ट ठरेल.

सौ. मृणाल परांजपे यांनी केलेले काही लावण्यांचे स्वरलिपी लेखन लावण्यांच्या अभ्यासाला नवी दिशा देणारे आहे. या स्वरलिपीलेखनासोबतच या लावण्यांमधील काव्यसौंदर्य आणि स्वरसौंदर्य यांविषयीचे विवेचक लेखन त्यांनी करणे आवश्यक आहे. लावण्यांच्या प्रारंभी त्यांनी काही त्रोटक परिचय दिलाही आहे, परंतु तो अपुरा आहे. संगीताच्या सर्व शाखांचा अभ्यास असणाऱ्या मृणाल परांजपे यांनी हे प्रकरण विस्तारशः लिहायला हवे. तसा तर तो स्वतंत्र पुस्तकाचाही विषय ठरू शकतो.

वसंतरावांकडून 'उत्पातांचा लावणी इतिहास' लिहून झाला, प्रसिद्धही झाला. त्यांचे प्रेरणास्थान असलेले ज्ञानोबा उत्पात हे पुस्तक पाहण्यासाठी आज आपल्यात नाहीत. ते असते, तर तृप्तीची, समाधानाची पावती त्यांनी नक्कीच दिली असती. तेवढी गुणवत्ता या पुस्तकामध्ये निःसंशयपणे आहे.

◇◇◇

**डॉ. विद्याधर सीताराम करंदीकर**
'चैतन्य', कणकवली, जि. सिंधुदुर्ग
फोन (०२३६७) २३२३८१

**उत्पातांचा लावणी इतिहास (मे २०१२)**
*लेखक :* वसंत भगवान उत्पात
*प्रकाशक :* विनय वासुदेव उत्पात, पंढरपूर
*पृष्ठ :* १३२, *किंमत :* रु. २२०/-



अनुक्रमणिका



# 'माणसांच्या गाथा... शिकारीच्या कथा' त्रिवेणी संगमावरचं साहित्य शिल्प!

ॲड. बी. एस. पाटील (अण्णा)

– दि. बा. पाटील

'माणसांच्या गाथा...शिकारीच्या कथा' हे ॲड. बी. एस. पाटील अण्णा यांचं पुस्तक मराठी साहित्यातल्या एका वेगळ्या प्रकारातलं म्हणता येईल, कारण मराठी साहित्यात व्यक्तिचित्रांचं लेखन आणि ललित कथा एकत्रित सामावणारी फारशी पुस्तकं नाहीत; त्यामुळे हे पुस्तक नेमक्या कोणत्या प्रकारात समाविष्ट करता येईल असा प्रश्न समिक्षकांना पडेल. तरी पण समीक्षेपेक्षा हे पुस्तक ओघवत्या शैलीतील, वाचनीय व वाचनाचा निर्भेळ आनंद देणारं आहे. हे नाकारून चालणार नाही.

पुस्तकाच्या मुखपृष्ठावरील निसर्गरम्य चित्र आणि आतील काही रंगीत पानावरची निसर्गचित्रं या पुस्तकाचा बाज फुलवंतात. व्यक्तिरेखांची व शिकारकथांची रेखाटनं आशय व्यक्त करणारी आहेत.

सुरुवातीलाच श्री. पाटील यांच्यावर निर्व्याज प्रेम करणारा निष्पाप वृत्तीचा 'केरुमामा' अवतरतो त्याच्याबरोबरच बारा बलुतेदारांचं प्रतिनिधित्व करणारे दत्ता वाणी, बाबुराव दाजी, न्हाव्याचा मदन, मुलकी पाटलाचा बाबू असे सवंगडी या व्यक्तिचित्रांचा आशय बनतात. खेड्यातल्या घरावरची खापरी कौल, घरापुढे असणारे तुरटीचे कुडं, गोठ्यातल्या गायी-म्हैशी, घरातल्या एका कोपऱ्यात असणारं दगडी होन, मधल्या लाकडी खांबाला बांधलेली ताक घुसळणारी रवी, बाजूच्याच कोपऱ्यातली मातीच्या गाडग्यांची उतरंड, धूर ओकणारी चूल ही सर्व वर्णनं आधुनिकतेच्या झपाट्यात लुप्त होत चाललेल्या ग्रामसंस्कृतीला पानोपानी जिवंत करतात; आणि एका अस्तंगत झालेल्या ग्रामीण जीवनातल्या खऱ्याखुऱ्या आनंददायी जगण्याची हुरहुर वाचकाला अस्वस्थ करते.



लेखकाला आपल्या घरच्या शेळीचं दूध पिण्यासाठी आग्रह धरणारी केरूमामाची आई 'किसा म्हातारी' ही खेड्यातल्या नि:स्वार्थी जिव्हाळ्याचं प्रतिनिधित्व करते. बलुत्यावर गावकी करणारा, गावातील लोकांच्या फुकट हजामती करणारा केरुमामा बदलत्या गावाबरोबर बदलत नाही; त्यामुळे तो व त्याचा धंदा उद्ध्वस्त होतो, ही सल वाचकाला बोचत राहते.

याच पठडीतला साळढाळ मोकळ्या स्वभावाचा, पण खोडकर 'दत्ता' त्याच व्यवस्थेतून आला आहे. 'विंच्या पाटील' ही व्यक्तिरेखा गावच्या पोशिंद्या पाटलाची, खानदानी ढब जपणारी, या व्यक्तिचित्रातला चौसोपी वाडा, बारीक टाकीच्या घडीव दगडांची ढेलज, वाड्याच्या तोंडालाच घोडा बांधण्यासाठी असणारा दगडी खुंटा, स्नानगृहातलं भलं मोठं तांब्याच्या धातूचं घंगाळं हे शब्द इतिहासकालीन खेडूत व्यवस्था मांडतात.

"कुणालाही न सलणारा हा पाटील चांगल्याशी चांगला; आणि वाईटाशी संगत न करणारा होता." या एकाच वाक्यातून विंच्या पाटलाची व्यक्तिरेखा स्पष्ट होते.

आतड्याची माया घेऊन वावरणारी 'जना गुरवीन' तिच्या एकाकीपणे जगण्याने अस्वस्थ करते. बैलाच्या झुंजीची ईर्षेने तयारी करणारा सखा कोकण्या विशाळगडची हिरवी कफणी आणून बैलाच्या गोठ्यात बांधतो.

देवरशाने दिलेले गंडे दोरे, लिंबू



अनुक्रमणिका

बैलावरून उतरून टाकतो. ही खेडेगावातली अंधश्रद्धा सखा कोकण्याच्या रूपाने व्यक्त होते. या व्यक्तिचित्रातला 'बन्र्याळ' हा शब्द आणि काळवीटाच्या शिंगाच्या दांड्याचा चाबूक हे शब्द खूप जुन्या खेड्याचं दर्शन घडवतात. गाव बदलतं तसं सखाचं जगणं अधिक कठीण होतं, त्याच्यावर हमाली करण्याचा प्रसंग येतो हे वाचताना डोळ्यांच्या कडा ओलावतात.

'दत्तु पोष्टमन' हा सुद्धा एक बैतेकरी न्हावी पण फावल्या वेळेत पोष्टाचं काम करणारा. गरिबीनं पछाडलेला दत्तू म्हणतो, 'आम्हाला कुठलं इनाम?... तुमचं बैतं आणि आमचं जीणं' या एकाच वाक्यात श्री. पाटील यांनी दत्तूचं अठराविश्व दारिद्र्य मांडलं आहे.

या व्यक्तिचित्रांच्या बरोबरच या पुस्तकातल्या 'उमरकांचनचा एकुल' 'वेळ बऱ्याचवर होती.' 'कौंडीण्यपुरचा एकांडा' या शिकारकथा रोमहर्षक तर आहेतच पण जंगल निरीक्षणाचा उत्कृष्ट नमुना म्हणूनही या कथांकडे पाहता येईल. कथेत डोकावणारे भटक्या जमातीतले तायाप्पा आणि यल्लापा ही भावांची जोडी शौर्याचे प्रतिक आहेत. 'दरवडा' कथेतला न पडलेला दरोडा वाचकांची उत्सुकता शिगेला नेऊन ठेवतो. या पुस्तकाच्या शेवटी शब्दबद्ध केलेलं 'मनातलं गाव' अप्रतिम आहे. गावाचं आणि गावकीचं चौफेर निरीक्षण व परीक्षण ही या लिखाणाची अत्यंत जमेची बाजू आहे. पुस्तकाच्या पानोपानी श्री. पाटील यांची चिंतनशीलता आणि सूक्ष्म निरीक्षण क्षमता जाणवल्याशिवाय राहत नाही. बदलणाऱ्या व आधुनिकतेचा स्वीकार करणाऱ्या गावावर भाष्य करताना लेखक लिहितात...

'एका मुठीतलं गाव अनेक मुठींत समाविष्ट झालं... त्यामुळे हातात हात घालून जगणं बंद झालं आणि मुठीच्या ताकदीचा धाक वाढत राहिला... आता गांव पहिला राहिला नाही!' ही वाक्य खूप बोलकी व आधुनिकतेच्या वाटेवर उद्ध्वस्त होत चाललेल्या समाजव्यवस्थेवर भाष्य करणारी आहेत. 'सांगण्यासारखं गाव आता मात्र राहिलेलं नाही!' या शेवटच्या वाक्यातून समाजमनाची उद्विग्नता स्पष्ट होते.

एकूणच या पुस्तकाची, व्यक्तिरेखांपासून कथापर्यंतची आणि 'मनातलं गाव' या ललित लेखाला सामावणारी व्याप्ती खूप विस्तृत व वास्तवदर्शी आहे. मराठी साहित्याच्या तीन प्रवाहांना कवेत घेऊन वाचकांना मंत्रमुग्ध करणारं हे पुस्तक त्रिवेणीसंगमावरचं 'साहित्यशिल्प' ठरेल, असा विश्वास वाटतो!

❖❖❖

**दि. बा. पाटील (कामेरी)**
ता. वाळवा, जि. सांगली.

## प्रकाशकांना आवाहन

महाराष्ट्र साहित्य पत्रिका सुमारे दहा हजार सभासदांपर्यंत पोहोचते आहे. आपल्या प्रकाशनाच्या दर्जेदार पुस्तकांचे परीक्षण साहित्यपत्रिकेत यावे हा आमचा प्रयत्न असतो. त्यासाठी आपली नव्याने प्रकाशित झालेली पुस्तके परीक्षणासाठी अवश्य पाठवावीत. प्रतीवर परीक्षणासाठी असा उल्लेख जरूर असावा.

पत्रिका सर्व दर्जेदार ग्रंथांचे अगत्याने स्वागत करीत आहे तसेच आपल्या प्रकाशनाची जाहिरात पाठवूनही सहकार्य करावे; ही विनंती.

संपादक
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे करीता



अनुक्रमणिका

पुस्तक परिक्षण

# 'धुनी' - एक परिपूर्ण अनुभव

– अंजली कुलकर्णी

मराठवाड्याच्या भौगोलिकदृष्ट्या दुष्काळी भूमीवर सशक्त, रसरशीत आणि आशयसमृद्ध कवितेची झाडं पूर्वापार बहरत आलेली आहेत. या कवींच्या मांदियाळीतलं एक महत्त्वाचं नाव म्हणजे नांदेडचे सुरेश सावंत. 'अबोली' (१९८७) आणि 'दुभंग' (१९९२) या कवितासंग्रहांच्यानंतर तब्बल १० वर्षांनी 'धुनी' हा त्यांचा कवितासंग्रह 'शब्दालय' प्रकाशनाच्या वतीनं प्रकाशित झाला आहे.

टोकाची संवेदनशीलता, भावनाशीलता, दुनियादारीच्या विपरीत दर्शनानं दाटून येणारी अस्वस्थता आणि समाजाच्या भल्यासाठी तळमळणारी मानसिकता यांचा एकत्रितपणे प्रत्यय देणारी कविता या संग्रहात आहे. कवीच्या विशिष्ट अशा व्यक्तित्वाचं प्रतिबिंब या संग्रहातील कवितांच्या स्वभावात सापडतं.

विशेष म्हणजे आजच्या केवल वुद्धिजन्य आणि काहीशा अकाव्यात्म, रूक्षतेकडे झुकणाऱ्या कवितांच्या पार्श्वभूमीवर सुरेश सावंतांच्या कवितेतील भावनात्मकतेचा ओला स्पर्श दिलासा देऊन जातो.

कवितांचीही 'धुनी' अशी पेटलेली आहे. परंतु तिचे एकच एक केंद्र नाही. या 'धुनी'च्या प्रज्वलित होण्याच्या जागा वेगवेगळ्या आहेत. या कवितासंग्रहातील आशयसूत्रांची ठोबळ मानानं तीन केंद्रं सापडतात. त्यातलं एक प्रीतितत्त्व आहे, ज्याला प्रेमाचा सनातन रंग माखलेला आहे; दुसरं म्हणजे 'स्व' आणि 'स्वेतर' यांच्यातील काहीशा ताणलेल्या, दुराव्याच्या संबंधांचं जग आणि तिसरं आणि महत्त्वाचं केंद्र म्हणजे भोवतालाचं तीव्रोत्कट भान. या तीन आशयसूत्रांनी कवीची कवी म्हणून असलेलं त्याचं संपूर्ण व्यक्तित्व वेढलेले आहे.



कवितासंग्रहाच्या सुरुवातीलाच सुरेश सावंतांनी कवितेच्या येण्याविषयीची कविता लिहिली आहे. ते म्हणतांत,

*'जेव्हा जगणं थांबलेलं असतं*  
*आंबलेलं असतं*  
*तेव्हा चालत येते आपल्या पावलांनी*  
*जेव्हा जगणंच होतं स्वत:त मश्गुल*  
*तेव्हा कवितेला येते ग्लानी...'*

खरंतर जगणं सुरू असतानाच कविताही कवीच्या आंतरिक विश्वात जगत असते. ती जगणं मूकपणे टिपत असते. तिच्यावर सुखाचे तरंग आणि दु:खाचे घाव उमटत असतात. कविता हे खरे तरंग, लहरी, रोमांच, जखमा, घाव, चरे, ओरखाडे झेलत कवीच्या अंतर्यामी वाढत असते; आणि कवीच्या नेणिवेत तिच्या भावसंपृक्ततेचा रेटा वाढला, की ती पक्व फळाप्रमाणे अलगद अंत:करणातून बाहेर पडून कागदावर उतरते. जे कवी मनाच्या गर्भभूमीमधून कवितेला अर्ध्याकच्च्या अवस्थेतच बाहेर ओढून काढण्याचा प्रयत्न करतात त्यांची कविता पूर्ण वाढ न झालेल्या भ्रूणाप्रमाणे दिसते. परंतु सुरेश सावंत मात्र आपल्या आत वाढणाऱ्या कवितेला घाई न करता वाढू देतात. अनुभूतीची वाढ पूर्ण होऊ देतात म्हणूनच त्यांची कविता हा एक परिपूर्ण

अनुभव असतो.

सुरेश सावंत यांची 'धुनी' या संग्रहातील कविता जगणं काहीकाळ थांबतं ते स्वत:च्या पायांनी चालत येते. परंतु म्हणून ती जगण्याशी फटकून आहे, असं मात्र नाही. उलट ती जगण्याशी तादात्म्य पावलेली, एकरूप झालेली कविता आहे. जगण्याबरोबर तिचं प्रेम जडलं आहे, जगण्याचे लाडकोड करता करताच जगण्याशी तिचं मनस्वी भांडणही सुरू आहे. जगण्यात गळ्यापर्यंत बुडूनही जगण्याविषयी परात्मभाव बाळगणारी ही वेगळीच कविता आहे.

प्रीतितत्त्व हे या कवितासंग्रहातलं एक मनोरम सुंदर तळं आहे.

*'सखे माझ्या रोमरोमी*
*साद घालतो पाऊस*
*माझा आषाढ टाळून*
*नको निघून जाऊस'* किंवा
*'पापण्यांच्या पाकळ्या तू मळी उघडू नको*
*मूळचा कैदी मी तिथला नेत्रांत बंद आहे'*

अशा मृदू मुलायम शैलीमध्ये उत्कट प्रीतिभावना व्यक्त होते. गजल, गीत किंवा छंदोबद्ध अभिव्यक्ती अशा वेळी कवीला अधिक जवळची वाटते.

*'स्पर्श होता चंद्रभोळा चांदण्याचा दीप व्हावा*
*तू शिरावर माळण्याने मोगरा गंधित व्हावा'*

अशा तजेलदार, देखण्या शब्दकळेनं प्रीतिकविता रोमांचित झालेली दिसते. पण त्याचवेळी प्रीतीच्या देखण्या रूपालाही उत्पत्ती, स्थिती आणि लयाची अपरिहार्यता टाळता येत नाही आणि एका टप्प्यावर 'सखे, आपण एकमेकांना भेटतो म्हणजे खरंच काय करतो?' हा प्रश्न छळू लागल्याशिवाय राहत नाही.

'स्व' आणि 'स्वेतर' जग यांच्यातील संबंधांचा शोध हा या कवितांचा आणखी एक केंद्रबिंदू आहे. जगत असताना अटळपणे भेटणारी, आपल्याशी रक्ताने, बिनरक्ताने, नात्यांनी, बिन नात्यांनी, इच्छेनं, अनिच्छेनं जोडली, तोडली गेलेली माणसं हा आपल्या जगण्याचा अपरिहार्य भाग असतो. ही विविध प्रकारची माणसं आपल्याला विविध तऱ्हेनं घडवत बिघडवत असतात. ती आपल्याशी आणि आपण त्यांच्याशी विविध तऱ्हांनी सहकंप पावत असतो. मानवी वर्तनाच्या या विविध परींचा वेध हा या संग्रहातील अनेक कवितांचा आशयबिंदू आहे. माणसांच्या वर्तनातील, मानसिकतेतील संगती, विसंगती, मतलबीपणा, संधीसाधूपणा, धोकेबाजी या साऱ्यांचा शोध घेताना सुरेश सावंतांची लेखणी व्यथित होते. उदा. 'नांदी' या कवितेत ते लिहितात,

*''आपण तर कधीच फिरकलो नाही*
*मत्सराच्या मेळ्यात*
*का माजतंय द्वेषाचं पीक*
*शेजाऱ्यांच्या डोळ्यांत?*
किंवा
*पांचालीच्या असो की पापभीरूच्या*
*वस्त्रहरणानेही किती छान करमणूक होते*
*रंजनप्रेमी जगाची*
*कुणीच पांघरत नाही*
*बोटभर चिरगूट, उलट*
*संशयाचे ढग गडद होत जातात' (अन्वयार्थ)*

एखाद्याच्या दु:खात आनंद मानणाऱ्या माणसांची मानसिकता कवीला व्यथित करते.

आप्तस्वकीयांच्या, माणसांच्या गर्दीतही आपण एकटे आहोत, परके आहोत, अशी एक उदासपणाची, परात्मपणाची भावना त्यांच्या अनेक कवितांमधून व्यक्त झाली आहे.

या एकाकी, तुटल्या, भंगल्या अवस्थेत ''समर प्रसंगी माझ्या तुका झाला सखा खरा' अशी 'तुका'चीच साथ कवीला खरी वाटते; आणि 'म्हटलं तर' या कवितेत त्यांनी म्हटल्याप्रमाणे आयुष्याच्या वृक्षावरून उडून गेलेल्या पत्रास पक्ष्यांना 'अथांग निळ्या आभाळात मनसोक्त विहारासाठी मीच त्यांना मुक्त केले' अशी मनाची समजावणी कवी करतो आहे.

'स्व' आणि 'स्वेतर' यामधला हा झगडा, ही

तणावाची स्थिती, हा दुराव्याचा प्रदेश कवीच्या संवेदनशीलतेनं तीव्रोत्कट बनला आहे.

सुरेश सावंत यांच्या कवितेचं तिसरं आणि महत्त्वाचं आशयकेंद्र आहे. भोवतालाचं तीव्र भान. वास्तविक पाहता ही तीन आशयकेंद्रं परस्परांपासून अलग वाटली तरी त्यात तशी अलगता नाहीच.

जगताना येणाऱ्या अनुभूतींचीं ती विविध स्पंदनं आहेत इतकंच. एखाद्या तळ्यात तीनचार ठिकाणी खडे मारावेत आणि त्यांनी निर्माण केलेली तरंगांची वर्तुळं शेवटी एकमेकांत मिसळून जावीत तसा हा सगळा मिळून जगण्याचाच एक एकात्म परिणाम आहे. भोवतीच्या जगाशी जोडले जाण्याची प्रक्रिया प्रीतिभावनेनं सुरू होते आणि जगाच्या अक्राळविक्राळ रूपाच्या राक्षसानं दाराशी येऊन धडकण्यापर्यंतच्या अनुभवांपर्यंत येऊन ही ओळख पुरी होते.

या कवितासंग्रहात भोवतीच्या जगातल्या अनेक विपरीतींवर, विसंगतींवर कवीनं नेमकेपणानं बोट ठेवलं आहे. विशेषत: कवी ज्या क्षेत्रात वावरत आहे, त्या शिक्षणक्षेत्रातील अस्वस्थ करणाऱ्या घटनांचे, वातावरणाचे पडसाद सुरेश सावंतांच्या कित्येक कवितांमध्ये पडलेले दिसतात.

शिक्षणासारख्या पवित्र मानल्या गेलेल्या क्षेत्रात प्रवेश करताना कदाचित त्यांनी देशाच्या उद्याच्या भविष्याची सोनेरी स्वप्नं पाहिली असतील, काहीतरी विधायक, सुंदर जग घडवण्याचं ध्येय, मनीषा, आकांक्षा त्यांनी उराशी बाळगली असेल. पण या पवित्र क्षेत्रातील बजबजपुरी आणि भ्रष्टाचाराची परिसीमा बघून त्यांच्यातील कवीचं मन विषादानं, अपेक्षाभंगानं तुटून फुटून जातं.

या संग्रहात शिक्षणक्षेत्रातील या असंवेदनशील बजबजपुरीवर लिहिलेल्या अनेक कविता सापडतात. त्या कविता म्हणजे कवीच्या फाटलेल्या अंत:करणाचे तुकडेच आहेत. 'पोपट मेलेला नाहीय... अजून' या कवितेत असा व्यथित करणारा जीवघेणा अनुभव कवीनं दिलाय. ते म्हणतात,

*'किती पाषाणपालव्यांचे शेंडे बोडखे झाले*
*किती पिढ्यांचे गिनिपिग वंद झाले*
*प्रयोगांच्या पेटाऱ्यात*
*किती एक कोवळे जीव चिणून मारले*
*या चिरेबंदी वाड्यात*
*घडविण्याच्या गोंडस नावाखाली'*

कोवळ्या जिवांच्या आयुष्यांचा असा खेळखंडोबा करणाऱ्या शिक्षणव्यवस्थेतील विदारक अनुभव व्यक्त करताना सुरेश सावंतांची लेखणी आत्यंतिक धारदार बनली आहे. त्याचबरोबर त्यातला विषादाचा, दु:खाचा आणि अपेक्षाभंगाचा स्वर एवढ्या हिवेला पोहोचला आहे, की या दु:खाची धग वाचणाऱ्याच्या अंत:करणापर्यंत पोहोचल्याशिवाय राहात नाही. 'माझा मुलगा' या कवितेतही आजच्या मध्यमवर्गीयांची मुलांविषयीची स्वप्नं फक्त ऐहिक सुखांभोवती, आत्मकेंद्रित चौकटीत बद्ध झालेली आहेत, आणि त्यांच्या पूर्ततेसाठी त्यांना अमानवी स्पर्धेत ढकलण्याचा क्रूरपणा करण्यासही ते कचरत नाहीत, यातील विदारकता अधोरेखित झाली आहे. ते म्हणतात,

*"माजा मुलगा आता सरावानं*
*उंच उडी मारतो*
*लांब उडी मारतो*
*यदाकदाचित त्याची उडी*
*साता समुद्रापार*
*गेलीच नाही तर?*
*माझ्या मनात पापशंका डोकावते"*

'तो पक्षीमित्र एक' ही या संग्रहातील एक अत्यंत संवेदनशील कविता आहे. पाखरांना उन्हाळा सुसह्य व्हावा म्हणून त्यांच्यासाठी दाण्याची, पाण्याची, घरट्याची सोय केली तरीही पाखरं दाणापाण्याला शिवत नाहीत. घरट्याकडे ती शंकेनं पाहतात. 'स्फोटकं तर पेरली नसतील घरट्यात माणूस नावाच्या प्राण्यानं?' अशी शंका त्यांच्या मनात येते.

संपूर्ण जगात आज एक प्रकारचं दहशतपूर्ण,



अनुक्रमणिका

युद्धसदृश, हिंसात्मक वातावरण निर्माण झालंय. अशा विषारी वातावरणात परस्परांविषयी वाटणारा विश्वास, प्रेम आस्था लयाला जाऊन परस्परांविषयी अविश्वास, संशय आणि घृणेचंच वातावरण निर्माण झालंय.

आजच्या वर्तमानातील याच विदारक वस्तुस्थितीला सुरेश सावंतांनी या कवितेत अधोरेखित केलं आहे. 'कवी' या कवितेतही असाच सारा अंगावर येणारा भोवताल आहे, भोवतालाचे प्रश्न आणि त्या प्रश्नांनी निर्माण केलेला कोलाहल आहे. मिट्ट अंधार आहे.

'पेपरवाला' सारख्या कवितेतूनही रोज सकाळी वर्तमानपत्राच्या माध्यमातून अंगावर कोसळणारं भयावह वर्तमानाचं चित्र कवीनं उभं केलं आहे.

आजच्या वर्तमान जिण्याचं भयावह स्वरूप या कवितांमधून ज्या संवेदनशीलतेनं व्यक्त झालं आहे. त्यामुळे या कवितांची उंची वाढली आहे.

भोवताली दिसणारी भ्रष्टाचारी वृत्ती, स्वार्थीपणा, क्रूरता, जीवघेणी स्पर्धा, असंवेदनशीलता, मानवी मूल्यांची पायदळी केलेली तुडवणूक, ऐहिक सुखांची वाढलेली हाव आणि तरीही माणसांच्या मनात भरून राहिलेली अतृप्ती, असमाधान, बधीरपणा या सगळ्यानं व्यथित होणारं कविमन या संग्रहातल्या कवितांमधून ठायीठायी भेटतं.

या कविमनाला आंस आहे ती मूल्ययुक्त जीवनाची, आनंदमय, प्रेममय, प्रीतिमय जगण्याची. म्हणूनच हा कवी कवितांची 'धुनी' पेटवून बसलाय. पण भूमीचे भूगोल निकट निकट येऊनही संवेदनांचं संदेशवहन मात्र ठप्पच असल्याचं त्याला समजून चुकलंय. 'भुकेइतकं आणि भाकरीइतकं निर्मळ नैतिक काहीच नसतं या जगात' हा उद्‌गार आहे.

सुरेश सावंत नावाच्या पारदर्शक कवीच्या कवितेचा. या पारदर्शकतेनंच सुरेश सावंत या कवीची कविता सामर्थ्यवान बनवली आहे.

◇◇◇

**अंजली कुलकर्णी**
३, विघ्नहर अपार्टमेंट,
जयवर्धमान सोसा.,
बिबवेवाडी रोड, पुणे ४११०३०
भ्रमणभाष – ९९२२०७२१५८

---

**नवीन आजीव सभासद**

गोडसे वैभव विद्याधर, चिंचवड
कुमठेकर सीताराम मोरेश्वर, पुणे
वाडेकर जयप्रकाश पांडुरंग, चिंचवड
दुधाळ कल्पना आलिंदर,
भिडे चित्रगुप्त अनंत, पुणे
इनामदार श्रीकांत दत्तात्रय, शिराळा
अत्रे कुमुदिनी गणपतराव, पुणे
देशपांडे सागर सुधाकर, पुणे
देशपांडे स्मिता सुधाकर, पुणे
देशपांडे स्मिता सागर, पुणे
टारे अजित भरमू
खेतकर गजानन अनंत
सावळजकर गजानन बळवंत
पोतदार सुभाष श्रीरंग
कुलकर्णी (निंगुडगेकर दीपक गजानन)
ठिगळे दत्तात्रय श्रीपती
टेगशे रेखा गजानन
शिधये स्वाती राजेंद्र, पुणे
परुळेकर अविनाश मधुसूदन, पुणे
चव्हाण सुनील हणमंतराव, नेवरी
बोडस विश्वास, पुणे
अवघडे जयवंत ज्ञानू, पुणे
खरे विजय शिवराम, पुणे
धारवाडकर विनया विजय, बदलापूर
उदावंत दीपक वामनराव, पुणे
सुतार प्रदीप शंकर, सांगली
बोधले शितल सच्चिदानंद,
वानखेड सविता सुधाकर, महाड
पाटील विद्या बळवंत, पुणे
साळुंखे नंदिनी प्रकाशराव, इस्लामपूर
पिंगळे किरण नामदेव, नाशिक
परुळेकर प्रदिप राजाराम, पुणे
मेहेंदळे मधुमिलींद धुंडीराज, पुणे
नाईक योगेश प्रकाश, पुणे
मुराळे दत्तात्रय पंढरीनाथ, चिंचवड
झिजुरके संगीता सावलाराम, सांगली
पालकर अनिल हनुमंतराव, निगडी
जोशी निलीमा दत्तात्रय, चिंचवड
पाठक अनघा अविनाश, निगडी
नाईक अरुण आकाश, कोटा
कांबळे विनोद रामा
मुळगुंड राहुल विजय, पुणे
हापन जयवंत रामचंद्र, पुणे
वेहेरे दिगंबर विश्वानाथ
कर्वे बळवंत लक्ष्मण



तुकोबांच्या आध्यात्मिक स्वरूपाचे प्रत्ययकारी चित्रण

# संत निळोबाराय कृत श्रीतुकाराम तुकारामस्तुती

— शीला निपुणगे

*संत शिरोमणी श्री तुकोराम महाराज आणि त्याचे परात्पर शिष्य निळोबाराय हा गुरुशिष्याचा अलौकिकबंध आहे. गुरुचे केवळ चरित्र श्रवण करून आणि त्यांच्या चालत्या-बोलत्या वेद-गाथेला आत्मसात करून, तुकोबाच्या ज्ञानी स्वरुपाचा साक्षात्कार व्हावा म्हणून तळमळणारे निळोबाराय, अवघ्या संतपरंपरेचे हार्द आहे. साक्षात् ईश्वरदर्शनाला तुच्छ लेखणारे निळोबाराय तुकोबाचे पायीच लीन झाले. श्रीतुकाराम महाराजांच्या निधनानंतर सुमारे २५ वर्षांनंतरचा हा प्रातिनिधिक लोकबंधच आहे. अवघ्या महाराष्ट्राला तुकोबाने वेद गायला लावले अभंगरूपाने! खऱ्या अर्थाने ते सामगायन आहे. आजही महाराष्ट्र ही आध्यात्मिक परंपरा गातच आहे.*

*— संपादक*

प्राचीन मराठी संतकवींपैकी अनेकांनी गुरुस्तुतीपर रचना केलेल्या आहेत. त्यामध्ये संत निळोबारायकृत 'श्रीतुकारामस्तुती' हे एक लक्षवेधी गुरुस्तवन आहे. वारकरी संप्रदायाचा वारसा लाभलेले संतसाहित्याचे अभ्यासक डॉ. यशवंत साधु यांनी या ग्रंथात संत निळोबाराय यांच्या रचनांचे सुबोध आणि साक्षेपी विवेचन केले आहे. भुजंगप्रयात वृत्तात रचलेल्या ३३२ श्लोकांचे हे निरूपण जिज्ञासूंना आणि अभ्यासकांना वेगळाच, अलौकिक आनंद देणारे आहे.

संत निळोबाराय हे तुकाराम महाराजांचे शिष्य म्हणविले जात असले, तरी त्यांना तुकारामांचा प्रत्यक्ष सहवास लाभलेला नाही. तुकाराम महाराजांच्या वैकुंठगमनानंतर २५-२६ वर्षांनी निळोबारायांचा जन्म झाला. तुकोबांचे पुत्र नारायणबुवा देहूकर यांच्याकडून निळोबारायांना तुकारामांचे चरित्र, काळ यांविषयी माहिती मिळाली; आणि त्यांच्याविषयींच्या अपार भक्तिभावातून निळोबारायांनी गुरुगौरवपर रचना केल्या; तथापि लौकिकार्थाने तुकारामांची प्रशंसा किंवा स्तुती त्यांनी केलेली नाही, तर तुकोबांच्या आध्यात्मिक स्वरूपाचे प्रत्ययकारी चित्रण त्यांनी या श्लोकांमधून केलेले दिसते. 'श्रीमद्भागवतातील 'ब्रह्मस्तुती'शी 'तुकारामस्मृती'चे बरेचसे साम्य आहे' असे लेखकाने म्हटले आहे ते सार्थच आहे.



या दृष्टीने या ग्रंथाचा आढावा घेतला असता, तुकाराम महाराजांची महती मनावर नव्याने ठसतेच; त्याचबरोबर संत निळोबाराय यांचा पारमार्थिक अधिकारही लखलखीतपणे जाणवतो. निळोबांनी – अभंग, आरत्या, गौळणी, रूपके, कूटरचना असे वैविध्यपूर्ण लेखन केले. चांगदेवचरित्र तसेच श्रीकृष्णचरित्रही लिहिले. त्यांच्या सर्वच लेखनातून त्यांच्या तत्त्वचिंतक, विरागी व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडते, तसेच ते 'श्रीतुकारामस्तुती' या ग्रंथातूनही घडते. या संपूर्ण ग्रंथाला एक भक्कम तात्त्विक बैठक आहे. निळोबांची तुकोबांवर आणि विठ्ठलावर डोळस श्रद्धा आहे. ज्ञानचक्षूंनी त्यांनी या दोघांचेही ब्रह्मरूप पाहिले आणि विशेष म्हणजे या रचनांमधून स्वत: निळोबाही या ब्रह्मस्थितीशी मनोमन तादात्म्य पावताना दिसतात.

*'निर्गुण निरामय संचलें । गुणातीत रूपा आलें ।*
*परात्पर ते सगुण झालें । उभें ठाकलें विटेवरी ॥*

हे निळोबांनी विठ्ठलाचे इतरत्र केलेले वर्णन त्यांच्या अधिकाराची साक्ष देण्यास पुरेसे आहे. विश्वाला व्यापून राहिलेले ब्रह्मतत्त्व सगुण रूपात विटेवर उभे आहे, ही त्यांची ठाम धारणा.

याच भावातून निळोबाराय तुकारामांच्या व्यक्तिमत्त्वाचा वेध घेताना दिसतात–

*'न ये जो कदा स्पर्शता कवळिताही ।*
*न ये जो कदा देखता ऐकताही ।*
*नव्हे जो कदा एकदेशी विदेशी ।*
*अलक्षी निळा लक्षितो नित्य त्यासी ॥'...*

विठ्ठलाप्रमाणेच तुकोबाही नाम-रूपातीत, गुणातीत आणि सर्वव्यापी आहेत. विठ्ठलच नव्हे, तर राम, कृष्ण, विष्णू या सर्व रूपांमधूनही निळोबाराय ब्रह्मतत्त्वाचीच अनुभूती नोंदवितात आणि तुकारामांची त्या रूपांशी असलेली एकरूपता विशद करतात.

*'तुका भासला मानवी वेषधारी ।*
*परी हा लिलाविग्रही निर्विकारी ।*
*स्वये श्रीहरी व्यापुनी सर्व जीवा ।*
*तुका तोचि तो हा परब्रह्म ठेवा ॥*

आणि मग निळाही – 'पदी लागला तोचि होऊनि ठेला ।' अशी आत्मानुभूती निळोबाराय प्रकट करतात.

तुकोबा स्वत: नित्य एकांतवासी, उदासी, भोगत्यागी, विरागी आणि सदासर्वदा अंतरंगी रंगलेले होते. त्यांची थोरवी या ग्रंथात निळोबांनी परोपरीने गायिली आहे.

'अणुरणीया थोकडा तुका आकाशाएवढा' अशी स्वत: तुकारामांची प्रचिती आहे. निळोबा येथे म्हणतात की, तुकारामांच्या ठिकाणी लघुत्वही नाही किंवा गुरुत्वही नाही. ते थोर जगद्गुरू असल्याने त्यांच्या ठायी लघुत्व नाही आणि गुरुत्व म्हणावे, तर त्यांच्या ठिकाणी जाड्य (जडत्व) नाही. त्यामुळे – 'गुरू ना लघु नोहुनी काहि ऐसा ।' अशी तुकारामांची भेदातीत अवस्था आहे.

या 'तुकारामस्तुती' मधून निळोबाराय यांच्या व्यासंगी आणि विचक्षण वृत्तीचाही प्रत्यय ठिकठिकाणी येतो. ज्ञानदेव महाराजांच्या भगवद्गीता, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी या सगळ्या महान ग्रंथांचे सार या ग्रंथात आहे. त्याचबरोबर उपनिषदे, षड्दर्शने, वेदान्त आणि पुराणे या सर्वांचा निळोबांचा अभ्यास त्यातून दिसतो. वेदान्तातील आभासवाद, बिंबप्रतिबिंबवाद, दृष्टिसृष्टिवाद, विवर्तवाद, मायावाद इत्यादींसह गहन असे तत्त्वचिंतन बहुतेक श्लोकांमधून लीलया आलेले दिसते.

निळोबांनी योजलेल्या प्रतिमा, उपमा, दृष्टान्त बरेचसे पारंपरिक आहेत. तंतू-पट, अलंकार-सोने, घटाकाश-महाकाश, प्रतिबिंब-आरसा, चंद्र-चकोर किंवा हिमालय, पृथ्वी असे कितीतरी. तसेच रावण, कंस किंवा भक्तप्रल्हाद अशा कितीएक उदाहरणांमधून त्यांनी तत्त्वचर्चा केलेली दिसते. या सर्वांमधून 'तत्त्वमसि' किंवा 'अहं ब्रह्माऽस्मि' अशी येणारी प्रतीती महत्त्वाची ठरते. सगुण-निर्गुण, साकार-निराकार, क्षर-अक्षर, व्यक्त-अव्यक्त अशा परमात्मरूपाविषयी निळोबाराय भरभरून लिहितात, तेव्हा त्यांची सात्त्विकता, तल्लीनता आणि तद्रूपता उत्कटतेने प्रत्ययास येत राहते.

तुकाराम हे निळोबांच्या गुरुस्थानी आहेत, ते मुमुक्षूंसाठी आत्मज्ञानरूपी सूर्याप्रमाणे चिदाकाशात तळपत आहेत. त्यांची विश्वात्मकता, विश्वरूपाशी झालेली एकरूपता निळोबाराय अनेक दृष्टान्तांमधून पटवत राहतात. काष्ठाच्या ठिकाणी अग्नी उत्पन्न झाला की, 'काष्ठपण' संपते. दोन्ही एकरूप होतात, तसा तुकोबांच्या ठिकाणी देहभाव शिल्लक नाही. ज्याप्रमाणे सूर्याला अंध:काराची जाणीवही नसते, तो स्वयंप्रकाशी असतो, तद्वत सद्गुरू हे 'बद्ध' आणि 'मुक्त' या दोन्ही अवस्थांच्याही पलीकडे असतात. मोहरूपी रात्रीला ज्ञानरूपी सूर्य संपवितो, त्याप्रमाणे गुरू आत्मज्ञानाच्या योगे मायामोह नाहीसे करतात.



अनुक्रमणिका

अशी अनेक उदाहरणे देतानाही निळोबाराय म्हणतात की – 'सद्गुरूंनी मला केलेला बोध' मी तुम्हास सांगत असलो, तरी वस्तुत: या सगळ्या जाणण्या-नेणण्याच्या पलीकडच्या गोष्टी आहेत. त्यातील सत्त्व जाणत्यांनी समजून घ्यावे, आणि आत्मस्वरूप शोधावे' असे आवाहन निळोबांनी पुन:पुन्हा केले आहे.

तुकाराम महाराजांचा गौरव करताना निळोबाराय स्वत: त्यांच्याशी एकरूपत्व साधतात. ही 'अद्वैतानुभूती'– जी परमार्थमार्गातील सर्वोच्च स्थिती आहे. ती – निळोबांच्या श्लोकरचनेतून सहजसुंदर रीतीने व्यक्त झाली आहे. 'तरी तोचि मी, मीहि तोचि स्वभावे' इतकी परिपूर्ण अशी ही अभिन्नता आहे. संत निळोबारायांचे श्रेष्ठत्व त्यांच्या या मनोभूमिकेतून मनावर बिंबत राहते.

*'तुका तोचि नीळा तसा ऐक्यरूपें ।*
*जनी दाउनी भिन्न दोनी स्वरूपें ।*
*अलंकार भासे परी तें सुवर्ण ।*
*नये भिन्न भेदातित एकवर्ण ॥'*

सोने आणि त्याचे अलंकार यांच्याप्रमाणे गुरू-शिष्याची ही एकरूपता भेदातीत आणि अस्सल आहे आणि अवघ्या विश्वरूपाशी ती एकरूप झालेली आहे.

*'तसे विश्व हे एक आत्माचि जाला ।*
*तयामाजि मी तोचि होऊनि ठेला ।*
*म्हणोनी धरा पाय त्या सद्गुरूचे*
*मनी ध्याऊनि स्वामिया तूकयाचे ॥'*

येथें निळोबांनी ही श्रेष्ठ अनुभूती नोंदविली आहे – 'मी स्वत: विश्वरूप परमात्म्याशी एकरूप झालो आहे आणि सद्गुरू तुकाराम तर त्याचेच रूप आहेत, असे ते म्हणतात, तेव्हा तुकाराम महाराजांविषयीची पराकोटीची श्रद्धा आणि त्यांच्या ब्रह्मस्थिती विषयीचा अढळ विश्वास प्रकट होतो. अशा सद्गुरूचे शिष्यत्व लाभले म्हणजे – 'आपणासारिखे करिती तात्काळ' याची साक्षात प्रचिती येते. म्हणूनच 'तुकयाचे पाय धरावे' असा बोध निळोबा करतात.

गुरुस्तुतीच्या मिषाने प्रत्ययाला आलेली निळोबाराय यांची पारमार्थिक उंची लेखक डॉ. यशवंत साधु यांनी मोठ्या ताकदीने निदर्शनास आणून दिली आहे. संतांचा वारसा सांगणाऱ्या लेखकांची साधुवृत्ती त्यांच्या परिशीलनातून साक्षित्वाने अनुभवास येते. अत्यंत नेमकेपणाने, संपूर्ण ग्रंथाला एकत्र गुंफणारे परतत्त्वाचे सूत्र त्यांनी शब्दांत पकडले आहे. निळोबांच्या रचनेत काव्यात्मता थोडी पण तत्त्वचिंतन अमाप आहे. ते जिज्ञासूंपर्यंत पोहोचविताना लेखकांच्या शैलीला लाभलेला परतत्त्वाचा स्पर्श अनोखा आनंद देणारा आहे.

◇◇◇

**शीला निपुणगे**
२, कस्तुरी सोसायटी,
३७१ ब शनिवार पेठ, पुणे ४११०३०.
भ्रमणभाष – ९८९०३५४३६२

---

**नवीन आजीव सभासद**

| | | |
|---|---|---|
| घोडे हेमांगी शिवाजी | कितनें वर्षा सिताकांत | जाधव विजय साहेबराव, वरवंड |
| लिमये साहील सोमकांत | वाघ मंदाकिनी नारायण | खैरनार राजेंद्र, बारामती |
| पाटील विजय पितांबर, धुळे | केळूस्कर पूनम नारायण, सांगली | सावंत विजय पांडुरंग, पुणे |
| बारी रेखा किशोर, धुळे | महाजन वंदना नथ्यू, धुळे | गावडे राजाराम प्रभाकर, बारामती |
| केसकर विजय विष्णूपंत, कळंब | गाढे शिला दत्तात्रय, पुणे | पाटील गिरीश चतरू |
| मिसाळ पांडुरंग उत्तमराव | चिने गीतांजली वाल्मीकीराव, पाटण | परिहार ब्रीजकुमार मोहनसिंह |
| झगडे नाना सोपानराव, हडपसर | गावडे कतपना नारायण, पिंपळेगुरव | ननावरे रावसाहेब दशरथ, नवलेवाडी |



अनुक्रमणिका



# माणसाच्या मनाचा तळ शोधणाऱ्या कथा : 'पानगळ'

– डॉ. राजेंद्र दास

आपण जसे आहोत तसे जगत राहिलो की, जगण्यातला आनंद आपल्याला मिळू लागतो; पण आपण जसे नाहीत तसेच समजून जर जगू लागलो तर जगण्यामध्ये विलक्षण असहाय्यता येते. अशी असहाय्यता एका नव्या अवस्थतेला जन्म देते, आणि त्यातून माणसामाणसांतील विसंवाद वाढू लागतो. नात्याची घट्ट वीणही सैल होऊ लागते, याचा प्रत्यय– प्रा. मिलिंद जोशी यांचा 'पानगळ' कथासंग्रह वाचताना येतो.

मध्यमवर्गीय माणसाचे आयुष्य सरळ रेषेतच असते हे नुसते लिहिण्याचे वाक्य झाले पण या कथांमधून याच मध्यमवर्गीय माणसांच्या जगण्यातली घुसमट यथार्थपणे चित्रित केलेली आहे. ही सारी माणसं तुमच्या-आमच्यासारखीच आहेत, पण अचानक आपण 'कुणीतरी'. आहोत, याची उबळ त्यांना येते आणि कमालीची निराशा त्यांच्या पदरी येते. 'कॉन्सेप्ट'सारख्या कथेमध्ये मानसीला एकाच वेळी खूप काही करायचे आहे. वृत्तपत्रात सदर लिहायचेय, मालिकांसाठी संवाद लिहायचेत. कथेवर चित्रपट व्हावा असं तिला वाटतंय. तिच्या लेखनाचे अभिवाचन व्हावे, त्यांचे प्रयोग सोलापूरात नव्हेत; तर पुण्यामुंबईत व्हावेत. तिच्या 'श्रावणावरच्या' गाण्याचा आल्बम निघायला हवा; आणि एवढे करूनही मुख्यमंत्र्यांच्या सभेचे सूत्रसंचालन तिला करायचे आहे. हे सारं ती करते पण तरीही काहीच




हाती येत नाही. खोट्या मोठेपणाच्या फुगाऱ्यातून ती लवकर बाहेर येत नाही. दु:खी होते. तिच्यापुरते सुरू असलेले हे संभ्रमाचे उत्सव तिचा नवराच संपवून टाकतो. ती जाग्यावर येते. मिलिंद जोशींचे सूत्र एवढेच आहे की स्वत:ची फसवणूक करून घेणारी माणसं सुखी होणार तरी कशी?

या संग्रहाची शीर्षक कथा 'पानगळ' वाचकांसमोर अनेक प्रश्नांचा आणि नात्यांचा गुंता उभा करते. खरे तर या कथेचा आवाका निदान एका कादंबरी इतका आहे. प्रा. शरद पोंक्षे नावाच्या प्राध्यापकाच्या दुटप्पी, भित्र्या आणि स्वार्थी वागण्यामुळे अवघ्या कुटुंबाला दु:ख सोसावे लागते. आयुष्याचे अनेक उन्हाळे पाहिलेले वडील 'आबा' असहाय्य आजाराने गलितगात्र झालेले. आई मरून मोकळी झालेली. तीन मुलांची तोंडे तीन दिशेला. दोन मुले परदेशात. एक इथे असून नसल्यासारखा. तो प्राध्यापकी करतो वडिलांची आईची सेवा करतो. आबांच्या आजारपणाचे निमित्त करून तो त्यांचे पैसे हडप करतो. आईच्या मृत्यूचे भांडवल करून आचार्यांची, सहकाऱ्यांची सहानुभूती मिळवतो. शेवटी बापाने कष्टाने बांधलेला बंगला विकायला काढून त्यांच्या मरण्याची वाटच जणू काही मोकळी करतो.

या कथेने अस्वस्थता निर्माण केली आहे ती भारतीय कुटुंबव्यवस्थेतील नातेसंबंधांची. जग काय म्हणेल, याची फिकीर नसणारे दीर-भावजय एकत्र







रहातात, एका प्लॅटमध्ये. लग्नही करू इच्छितात. नात्याचे पावित्र्य, संस्कृती या गोष्टी त्यांना बिनकामाच्या वाटतात.

दीर-भावजय असली ट्रॅडिशनल रिलेशन्स सांगू नका, असेल तो धाकटा दीर. आम्ही वयाने बरोबरीचे आहोत. आज आम्ही मनाने एकमेकांच्या जवळ आलो आहोत, तर तुमच्या दृष्टीने हा व्यभिचार ठरतो आहे. नैतिकतेच्या बदलत चाललेल्या असल्या कल्पनांनी आपला समाजरूपी वाडा ढासळतो आहे याची खंत कथाकार म्हणून प्रा. मिलिंद जोशी यांना आहे. ही पानगळ लवकर संपली पाहिजे, असेच त्यांनाही वाटते. महानगराने माणसाच्या नात्याची ही अस्पष्ट करून टाकलेली ओळख रानटीपणाचीच आहे. केवळ दोन शरीरे हेच ज्यांना जगण्याचे भांडवल वाटते ते कुठल्या संस्काराची बूज राखतील? सध्याच्या समाजव्यवस्थेतील हा गंभीर प्रश्न या संग्रहाच्या मध्यस्थानी आहे.

हाती मोठे शून्य घेऊन जगणारी असंख्य माणसे या कथांमधून दिसतात. 'बाप'सारखी कथा सावत्र मुलाच्या जगण्याचे धिंडवडे काढताना दिसते. जन्मल्यावर नीट काळजी न घेतल्याने मुलाचा हात थोटा होतो. मनगटच नष्ट होते, म्हणून मुलासह आईला सोडून देणारा नवरा 'बाप'मध्ये भेटतो. नशिबावर हवाला ठेवून बापाघरी राबणारी ही लेकुरवाळी, अनेक संकटांना सामोरी जाते. हाततुटका मुलगा हेच तिचे जगण्याचे भांडवल! पण नियती तिच्याही आयुष्यात दोन मुले असणारा बिजवर आणते; आणि हाततुटक्या मुलाचे जगणे अधिकच केविलवाणे होते. बाप या शब्दाचीच त्याला घृणा येऊ लागते. बालपण रम्य नव्हते. तारुण्यात तो परदेशी जातो तिथेही एकटाच असतो. आजोबाच्या घरचे लहानपणीचे 'बिनबापाचेच दिवस' चांगले होते, असे त्याला वाटू लागते. बाप म्हणजे आईचा नवरा. आपला कुणी नव्हे हे त्याला उमगले आहे. यासाठी त्याने फार मोठी किंमत मोजली आहे. हे अनाथपणाचे प्रश्न तो सातासमुद्राकडे नोकरीसाठी गेला तरी त्याचा पाठलाग करीत राहतात आणि तो एकाकी बनत जातो. शेवटी तो 'त्या' बापाच्या बायपास सर्जरीसाठी पैसेही पाठवितो, पण केवळ 'व्यवहार' म्हणूनच. लहानपणी शिकवणीचे पैसेही या दुसऱ्या बापाने भरले नव्हते, पण तो मात्र न विसरताही पैसे पाठवितो. व्यवहाराची परतफेड प्रेमाने व्हायला हरकत नव्हती; पण तसे घडत नाही. मुलं बापाहून जास्त व्यवहारी झाली आणि त्यांचं जगणं अगदी कोरडं झालं. दृष्टिकोन नीरस झाला. याला

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका स्वयंपूर्ण होण्याचे भाकित!**

'सांप्रत महाराष्ट्र भाषेचा परिपोष निरनिराळ्या तऱ्हेने होत आहे. तरी, खास साहित्य या विषयाकडे जावे तितके लक्ष गेलेले दिसत नाही. साहित्याकरिता वाहिलेले एखादे पत्र निघण्याचा काळ आता आला आहे व त्याची आवश्यकता भासू लागली आहे. असे पत्र निघेपर्यंत साहित्याची चर्चा करणारी 'पत्रिका' 'विविधज्ञानविस्तार'ला जोडून काढावी असा ठराव गेल्या ऑक्टोबरमध्ये (१९१२) अकोल्यास पुन्हा सजीव झालेल्या साहित्यपरिषदेच्या व्यवस्थापक सभेने केला आहे. न जाणो या पत्रिकेलाच काही कालाने स्वातंत्र्याचे पद मिळेल.'

महाराष्ट्र साहित्य पत्रिका : विविधज्ञान विस्तारान्तर्गत
पहिला अंक : ऑगस्ट १९१३





अनुक्रमणिका

जबाबदार कोण? हा प्रश्न कथाकार वाचकांवर सोपवितो.

नियती माणसाला तिच्याच वळणाने कशी जायला भाग पाडते हे 'समाधी'सारख्या कथेत जाणवते. कथाकार ज्या वातावरणात राहिला. त्याच्या अस्पष्ट खुणा या कथेत विखुरलेल्या दिसतात. रडकोजी बुवाची जत्रा ही माणसांच्या मनाचा निचरा करणारी. वासना घालविणारी, तिचे शमन करणारी आहे, पण ज्याच्या नशिबातच संन्यास लिहिलेला आहे, असा नायक या जंजाळातून सुटका करून घेण्याचा प्रयत्न करतो ही पण शेवटी त्याचे भागधेय ठरलेलेच असते.

या संग्रहातील 'दत्तकपुत्र', 'बायको', 'मनाचिये गुंती', 'कृष्णार्पणमस्तु' या सगळ्याच कथा अनेक अर्थाने माणसांच्या असहाय्यतेचे चित्रण करतात. नवरा मानसिक रुग्ण आहे. त्याला बायकोने केलेले उपचार रुचत नाहीत. 'दत्तकपुत्र' मधील मालक आणि मालतीबाई असहाय्य आहेत. नियतीने त्यांच्याशी रडीचा डाव खेळलेला आहे. एक मुलगा दत्तक घेतल्यावर त्यांना अपत्यप्राप्ती होते आणि ही दोन्ही मुले एकमेकांचे वैरी बनतात. यात नक्की दोष कुणाचा? आईबापांचा की मुलांचा? त्यामुळे घरं विस्कटून लागली आहेत. माणसं एकाकी बनली आहेत. बाप म्हणजे एक 'बॉयॉलॉजिकल ॲटम' बनू लागलेला आहे. ही फार मोठी शोकांतिका आहे.

एकूणच माणसाच्या मनाचा तळ शोधणाऱ्या या कथा वाचकांना अंतर्मुख करतात. त्यांचे जगण्याचे भान त्यांना परत मिळवून देण्याचा प्रयत्न करतात. माणसांचे एकाच घरात राहून, एकाच जगात राहून असे विसंवादी होणे समाजस्वास्थ्याच्या दृष्टीने अजिबात हितकारक नाही. नव्या जगात नवे प्रश्न निर्माण होणारच, पण असे नात्यातील गुंते निर्माण होऊ नयेत की ज्याच्यामुळे जगण्याच्या गळ्यालाच फास लागेल, याची दक्षता कुणी घ्यायची? असा प्रश्न या कथांनी समाजव्यवस्थेला विचारलेले आहेत. म्हणून या कथा वाचल्याशिवाय वाचक त्या खाली ठेवत नाही इतकी वेधकता त्यात आलेली आहे.

◊◊◊

**डॉ. राजेंद्र दास**
'अक्षर', आंतरभारतीजवळ,
मु. पो. कुर्डुवाडी, ता. माढा, जि. सोलापूर
मोबा. : ९८८१४२६४२९

**पानगळ : प्रा. मिलिंद जोशी**
संस्कृती प्रकाशन, पुणे ३०
*पृष्ठे* : १६८, *किंमत* : रु. १४०/-

**नवीन आजीव सभासद**

घेरे प्रभाकर बाबाराव, बारामती
पाटील सुधाकर तानाजी, कोपरगी
पाटणे यशवंत संभाजीराव, पुणे
कुलकर्णी रवीन्द्र मोहनीराज, अ. नगर
मोरे शुभांगी शरद, पुणे
बुवा विलास रूपनाथ, बारामती
सानप संजय माधव
चंपानेरकर प्रदीप मनोहर, पुणे
गोखले शंकर दत्तात्रय
होशिंग विनायक पांडुरंग, अ. नगर
कुलकर्णी अविनाश दत्तात्रय, अ. नगर
ठाकुर सुस्मिता राजेंद्र, अ. नगर
ठाकुर राजेंद्र रामचंद्र, अ. नगर
शिवलकर अरविंद वासुदेव, अ. नगर
शिवलकर रोहिणी अरविंद, अ. नगर
चौधरी नरेंद्र श्रीरंग, अ. नगर
आपटे श्रीकांत रघुनाथ, अ. नगर
चौधरी रंजना नरेंद्र, अ. नगर
वाळिंबे सुधाकर दत्तात्रय, पुणे
घाटवाड संजय श्रीपाद, पुणे
वडगांवकर संपदा सदाशिव, कोल्हापूर
मते मोहन सोपानराव, पुणे
बेंद्रे सुयोग यशवंत
लिमये विनायक केशव, पुणे
जगन्नाथ दगडू टेके, मंचर
मेत्रा प्रितम शहा, मंचर
गुलाब भिकाजी वळसेपाटील, मंचर
रोहिदास यशवंत भोर
सुनील मारोती वांगण
विशाल निवृत्ती करंडे
अजय दिनकरराव
दत्तात्रय विठ्ठल पारखी
हाजी हुसेनभाई बाबामीया शेख

*प्रसादची नवीन भव्य योजना*

*संस्कृत काव्याचे जणू पंचप्राण अशी*

# पंच महाकाव्ये

**(कै. मनोहर य. तथा बापूसाहेब जोशी स्मृतिग्रंथ माला)**

**सुलभ व रसाळ मराठीत**

**'प्रसाद'च्या सुप्रसिद्ध साहित्यिकांकडून हे ग्रंथ शब्दबद्ध झाले.**

---

| | | |
|---|---|---|
| **कुमारसंभवम्** | कालिदास | प्रा. अंशुमती दुनाखे |
| किं. रु. ३५०/- सवलत किं. रु. २८०/- | | |
| **रघुवंशमहाकाव्यम्** | कालिदास | प्रा. व. कृ. नूलकर |
| किं. रु. ६००/- सवलत किं. रु. ४८०/- | | |
| **किरातार्जुनीयम्** | भारवी | प्रा. अंजली पर्वते |
| किं. रु. ४००/- सवलत किं. रु. ३२०/- | | |
| **शिशुपालवधम्** | माघ | प्रा. व. कृ. नूलकर |
| किं. रु. ८००/- सवलत किं. रु. ६४०/- | | |
| **नैषधीयचरितम्** | श्रीहर्ष | प्रा. विमल पवनीकर |
| किं. रु. ६५०/- सवलत किं. रु. ५२०/- | | |

**एकत्रित किं. रु. २८००/- एकत्रित सवलत किं. रु. २२४०/-**

**पाठविण्याचा खर्च वेगळा पडेल.**

---

**प्रत्येक ग्रंथ ४०० ते ४५० पृष्ठांचा.**

**नैषधीयचरितम् प्रकाशनाच्या वाटेवर**

**सविस्तर माहितीकरिता कृपया पत्रव्यवहार करावा.**

**प्रसाद प्रकाशन**

१८९२, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०. फोन नं. २४४७१४३७

Email : prasadprakashanpune@gmail.com

website :www.prasadprakashan.com



अनुक्रमणिका



# ग्रामजीवनाचं अस्सल नाणं : कुणब्याचं गाणं

– डॉ. बाबुराव उपाध्ये

कवी गणेश मरकड यांचं 'कुणब्याचं गाणं' म्हणजे मराठी ग्रामजीवनाचं अस्सल नाणं आहे, असंच या कवितासंग्रहाचं लेणं आहे. गणेश मरकड म्हणजे ग्रामजीवनातलं अनुभवविश्व व्यक्तिमत्त्व असल्यामुळे या कवितेला अनुभवाचं बळ आणि प्रतिभेचं वलय लाभलं आहे. या कविता मराठी सारस्वताच्या मंदिरात निश्चितच पूजनीय ठरतील असा मला विश्वास वाटतो.

*"काळ्या मातीशी इमान राखून*
*निष्ठेनं हिरवं पीक घेऊन*
*स्वत: अर्धपोटी राहून*
*अख्ख्या दुनियेची पोटं भरवणाऱ्या*
*अन्नदात्याला*
*अर्थातच*
*रानपंढरीच्या विठोबाला"*

अर्पण केलेल्या या कवितासंग्रहाची आशयघनता मायमातीच्या सुपुत्राच्या जीवनाशी बांधलेली आहे – कविवर्य ना. धों. महानोर यांची प्रस्तावना या कवितासंग्रहाला लाभली हे अधिक महत्त्वाचं वाटलं.




"कुणब्याचं गाणं – अगदी साध्या सरळ शब्दांत. कुठे आकांडतांडव नाही; पण सल आहे, ती सल जखम दाखविणारी. खेड्यातल्या भणंग होत चाललेल्या कचखाऊ जगण्यातली."

या कवितेला ग्रामजीवनाचं जगणं माहीत आहे, म्हणून ती कवीच्या हृदयातून उगवली आहे. कवी मरकड हे एक संमजस आणि उच्चपदस्थ व्यक्तिमत्त्व आहे. अनुभवाची संयमशीलता त्यांनी जपली आहे, म्हणूनच ते 'मनमोकळं' करतात –

"मातीतून जसे तृणांकूर रुजून येतात अन् आभाळाशी मुक्त संवाद साधत वाऱ्यावर डोलत राहातात तशी कविता रुजून येते आतून खूप आतून – मनाच्या अंत:करणाच्या गाभ्यातून"

हे वास्तवरूप कवितेतून प्रकटतं. शेती, शेतकरी आणि कष्टकरी समाजाचं जगणं कवी पाहातात, जगतात आणि तितक्याच तीव्रपणे शब्दांतून व्यक्त होतात.

५१ कविता असलेला हा काव्यसंग्रह जगाचं पोट भरणाऱ्या दाव्याचं चित्रण करणाऱ्या आहेत– 'कुणब्याचं गाणं' या शीर्षक कवितेत म्हटलं आहे–

*"मातीच्या सुगंधानं*
*मन झाल रे बेधुंद*
*बेधुंद मनानं लेऊ*
*धरतीचं लेणं*
*कुणब्याचं गाणं गाऊ*
*कुणब्याचं गाणं"*

या कुणब्याचं जगणं आता महाग झालं आहे. या कुणब्याला सर्वजण कौतुकानं 'राजा' म्हणतात, पण त्या पाठीमागे 'बैलाच्या पाठीवर थाप' मला ऐकू येते. तू कष्ट करीत राहा – मरेपर्यंत कष्ट कर आणि म्हातारा झाला म्हणजे तुला कसायाच्या ताब्यात देता



अनुक्रमणिका

येईल. शेतकऱ्याचं जगणं असंच कष्टमय आहे. त्याची संख्या जास्त असली तरी तो विस्कळीत आहे. या एकजुटीच्या अभावानेच बहुसंख्यांक शेतकरीवर्गाची फरपट झाली आहे.

कवी लिहितात –

*''तो ओरडू पाहतोय*
*धाय मोकलून रडू पाहतोय*
*पण त्याचे ध्वनी उमटत नाहीत*
*कृष्णविवराच्या अफाट भिंतीतून*
*पोहोचू शकत नाहीत बाहेरपर्यंत''*

'कृष्णविवराच्या तळाशी' या कवितेत कवीने शेतकऱ्याच्या दुर्दैवी चक्रव्युहातले जगणे चित्रित केले आहे. माणसाला माणसासारखं जगता यावं म्हणून हे सर्व नीतिनियम तयार झाले आहेत, पण 'नीती' नसणारे नियमांना घाबरत नाहीत – गरीब माणूस 'नीती'ला देव मानतो. चरित्र व चारित्र्याला जपतो मात्र हा शेतकरी देशोधडीला लागला आहे. त्याचं विदारक दर्शन 'कुणब्याचं गाणं' मधून घडते.

औरंगाबादच्या 'मीरा बुक्स अँड पब्लिकेशन्स' यांची निर्मिती उत्कृष्ट आहे. कवितासंग्रहाचे मुखपृष्ठ अतिशय बोलके आहे. ग्रामीण जीवनाला न्याय देणारं आहे. साधी-सोपी शब्दकळा आतून वाहेरून सौंदर्यशील आहे. 'बा विठ्ठला' सारखी कविता शेतकऱ्यांच्या श्रद्धेचं सूत्र सांगणारी आहे. 'पानाड्या' कवितेतील शोषणव्यवस्था मनाला जाऊन भिडते. 'अंधारला गाव' आहे. पण त्याला उजेड देणारे नाहीत. शेतकरी केवळ 'चरणदास' आहे – भक्तीमध्येच जगण्याची शक्ती तो शोधतोय. मनाला चिंतनमग्न करणारी ही कविता मराठी साहित्याचे भूषण ठरणारी आहे. कवीच्या भावनांचा मुक्तप्रवाह शब्दाशब्दांत वाहत आहे.

अधिकारी पदावर कार्यरत राहूनही कवी म्हणून संवेदना जपलेल्या मरकड यांचं 'कुणब्याचं गाणं' मराठी भाषा, समाज व ग्रामसंस्कृतीच्या अस्तित्वाचं गाणं गाईल हा विश्वास वाटतो.

◇◇◇

**डॉ. बाबुराव उपाध्ये**
(मराठी विभाग प्रमुख)
रा. ब. ना. बोरावके महाविद्यालय
श्रीरामपूर जि. अहमदनगर

**नवीन आजीव सभासद**

वाघ विनय दत्तात्रय, पुणे
साळवी संगीता सतीश, पुणे
जाधव रितु राजेंद्र, पुणे
गायकवाड रितु अंकूश
देवळे प्रकाश केशवराव, पुणे
कांबळे अशोक विश्वनाथ, पुणे
कुलकर्णी मोहन मनोहर, पुणे
सादूल यशवंत, सोलापूर
माने ललिता सुरेश, उल्हासनगर
नाईक तपस्विनी लवू
मोरे दगडू नारायण, धुळे
जोशी अरविंद शंकर, पुणे
कुलकर्णी श्रीकांत प्रभाकर
कुलकर्णी मंजिरी श्रीकांत
पाठक किरण रवींद्र
राठोड अलका दगडू
चक्रे सिलीसिद्ध वर्धाना
कुलकर्णी प्रज्ञा प्रकाश
येवलेकर जान शामराव
येवलेकर रूपश्री जान
काकडे नलिनी नरहर
काळे नरेंद्र गोविंद
उपाध्ये पुरुषोत्तम केशव
जोशी अनिल भागीरथ
तडवलकर रोहिणी रामचंद्र
पतकी मोहिनी विजय
हलसगीकर रवींद्र गणेश
रामटेके भूषण महादेव
वैद्य प्रशांत मधुकर, पुणे
धर्माधिकारी संध्या सुर्यकांत, सोलापूर
जवळकर रेणवसिद्ध शंकर, सोलापूर
देशमुख रविंद्र राघवेंद्र, सोलापूर
माने राजेंद्र ज्ञानोबा, सोलापूर
कुलकर्णी महेश गणपतराव, सोलापूर
सुखसे सतीश तुकाराम, पुणे
वाडेकर विलास पांडुरंग, पुणे
शिंदे रवीकांत छगन, बार्शी
गवळी विजयश्री विठ्ठल, बार्शी
गलगली आनंद राजवेंद्र



अनुक्रमणिका




# ‘दुपारची सावली’तल्या कविता : वेगवेगळे रंग घेऊनं येणाऱ्या

– नंदा सुर्वे

अनेक माणसांमध्ये कवित्व असतं, पण काही जणांच्या बाबतीतच ते शब्दरूप घेऊन बाहेर पडतं. आपल्यातल्या कवीचा तो सुंदर शोध असतो आणि त्याचा आनंद अनमोल असतो. चंद्रशेखर धर्माधिकारी यांच्यातले काव्यगुण अनेक सुहृदांच्या प्रोत्साहनातून विकसित होत गेले. बहरत गेले.

अनेक कविसंमेलनांतून दाद घेता घेता त्यांचं कवीमन उल्हसित होत गेलं. नव्या नव्या कविता आविष्कारत गेल्या आणि त्यातूनच ‘दुपारची सावली’ या कवितासंग्रहाचा जन्म झाला. वयाच्या बासष्टीत बासष्ट कविता समाविष्ट करण्याचं वेगळंच औचित्य या कवीनं साधलं.

एका बँकेतून अधिकारी पदावरून सेवानिवृत्त झालेल्या चंद्रशेखर धर्माधिकारी यांची कवी म्हणून ठसठशीत ओळख झाली.

आपल्यातलं निगर्वीपण अभंग राहावं म्हणून सुरुवातीच्या ‘गणेश वंदना’ या कवितेत ते म्हणतात–

*आता मागणे इतुके देवा*
*निशी-दिन घडू दे मंगलसेवा*
*ज्ञान, बुद्धीचा द्यावा ठेवा*
*अहंकाराचे होऊ दे हवन*

जीवनमूल्यांचं इतकं सुंदर दान या कवीनं आपल्या प्रार्थनेतून मागताना स्वत:मधला सुजाण, संवेदनशील कवी जागवला आहे.

चंद्रशेखर धर्माधिकारी यांच्या बऱ्याचशा कविता सामाजिक, राजकीय जाणिवेतून, वेदनेतून आलेल्या आहेत. त्यात अस्सलपणा आहे. शब्दकळेची भट्टी कधी कधी कमी पडली तरी त्यामागची तीव्रता प्रखरता खूप बोलते आहे. ‘वसंतगान’ या कवितेत ऋतुराज वसंताचं वर्णन करताना त्यांचं कविमन लिहून जातं–

*सोन उन्हांचा घोस, गंधबावरा मधुमास*
*चांदण्यांची बरसात करी, धुंद आसमंत*

या काव्यामागची कवीची भावसृष्टी खूप समृद्ध आहे, पण त्याचबरोबर शब्दसृष्टी आणखी संपन्न झाली असती तर कविता अधिक खुलली असती. सशक्त झाली असती. वसंतऋतूवर अनेक कवींनी सृजनशीलतेची सुंदर ताकद असणारी काव्यं लिहिली आहेत. वसंतऋतू हा समस्त कवीकुळाचा लाडका ऋतू आहे. त्यावरचं काव्य खूप छान फुलवलं जातं.

परिस्थितीच्या भोवऱ्यात सापडलेला माणूस अनेकदा दिशाहीन होतो. त्याच्यातली त्यावेळची सैरभैरता लक्षात घेऊन कवीनं म्हटलंय,

*जायचे होते कुठे अन् कुठे गेलास तू*
*जिथून होते जायचे, तिथेच मार्ग चुकलास तू*
*अरुंद दृष्टीस रुंद वाट दिसता दिसत नाही*

यातलं ‘अरुंद दृष्टी’ आणि ‘रुंद वाट’ हे शब्दकौशल्य फार छान जमून आले आहे.




राजकारणावर आणि

समाजकारणावर ओरखडे ओढणं हा बहुतेक कवींचा आवडता काव्यप्रकार. या विषयांवर काव्यरचनेतली करामत त्यांना लीलया करता येते. त्याला रसिकांकडून दादही चांगली येते.

*गोडवे अहिंसेचे गाता गाता नेत्यांनाही*
*काट्याने काटा काढण्याचा सराव होत गेला*

तसंच–

*काळ आता असा विकृती संस्कृती वाटू लागली*
*नको त्या गोष्टींचाही प्रादुर्भाव होत गेला*

वर्तमान स्थितीचं नेमकं चित्र या कवीनं परिणामकारक शब्दांत उभं केलं आहे.

सामाजिक वास्तवाच्या संदर्भातला कवीच्या मनात असणारा असंतोष आणि त्यातूनच परिस्थितीला सामोरं जाण्याचा सोपा मार्ग दाखवताना म्हटलंय,

*तापला आहे तवा, जरा पोळी तू भाजून घे*
*असेना का टाळू कुणाची, लोणी तू खाऊन घे*

चंद्रशेखर धर्माधिकारी यांच्या कविता मनाच्या तळवटीतून बाहेर आलेल्या दिसतात. मनात उद्‌भवलेली उद्विग्नता, अस्वस्थता, नैराश्य व्यक्त करण्यासाठी त्यांनी काव्याचा हात धरलेला दिसतो. तो हात त्यावर चांगला बसत चाललेला दिसतोय. कवीजवळ सूक्ष्म निरीक्षणशक्तीही चांगली आहे. जीवनाकडे ते वेगवेगळ्या कोनांमधून पाहाताहेत. त्यातली त्यांची सवेदनक्षमता त्यांच्या काव्यात उतरलेली प्रत्ययाला येते.

बँकेत नोकरी केल्यामुळे 'नोट-तंत्र' त्यांना चांगले माहीत झालेले दिसते. या शीर्षकाच्या आपल्या कवितेत ते म्हणतात–

*'चेहेऱ्यावरती सौजन्याचा मुखवटा*
*खांद्यावर मात्र भ्रष्टाचाराचा कोट'*

नवरा-बायकोचं नातं जितकं चांगलं, जितकं सुदृढ तितके त्याला नाराजीचे कंगोरेही असतात हे सर्वमान्यच आहे. पण 'प्रहार' आणि 'वरे नव्हे' या दोन्ही कवितांमध्ये कजाग, असमंजस, मूर्ख बायकोचं चित्र उभं करून या नात्याला नकारात्मक रूप का दिलंय हा प्रश्न पडतो.

एकंदरीने दुपारच्या रणरणत्या उन्हातली मनाला शीतल आनंद देणारी 'दुपारची सावली' तशी आल्हाददायक आहे. निवांत करणारी आहे. या कवीनं अनेक विषयांना स्पर्श केलेला आहे. मानसिक भटकंतीला सुंदर काव्यरूप दिलेलं आहे. तरीही या काव्यरचनांना अधिक शब्दश्रीमंती, आशयश्रीमंती लाभली असती तर त्याला अधिक गहिरेपणाचं परिमाण लाभलं असतं. तरीही सकसतेकडची कवीची वाटचाल नक्कीच स्वागतार्ह आहे.

◇◇◇

**नंदा सुर्वे**
१४, सुजीत कॉम्प्लेक्स, वडगाव ब्रीजजवळ,
सिंहगड रोड, पुणे ४११०४१
फोन : २४३९०२७०/९४२३५३३२४०

**पुस्तक : 'दुपारची सावली'**
चंद्रशेखर धर्माधिकारी
*प्रकाशक :* प्रतिमा पब्लिकेशन, भोसरी, पुणे.
*पाने :* ८६, *किंमत :* १०० रु.

**म.सा.प.च्या शाखाप्रमुखांना महत्त्वाची सूचना**

आपल्या शाखेचे कार्यवृत्त पाठविणे ही शाखांची जबावदारी आहे. संबंधित शाखेच्या कार्यकारी मंडळाने ह्या कर्तव्याकडे लक्ष द्यावे; आणि आपल्या शाखांचे तिमाही कार्यवृत्त म. सा. पत्रिकेत प्रसिध्दीसाठी किमान १५ दिवस आगोदर पोहोचेल अशा बेताने पाठवावे. शाखांनी याबाबत उदासिन राहू नये; ही विनंती

**कार्याध्यक्ष आणि प्रमुख कार्यवाह म. सा. परिषद, पुणे ३०.**



अनुक्रमणिका



# निवडक नवे

*महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर.*

– उद्धव कानडे

## गोष्ट मेंढा गावाची

प्रसिद्ध लेखक मिलिंद बोकील यांच्या सिद्धहस्त लेखणीतून आणि अथक प्रयत्नांतून साकारलेला हा आगळा-वेगळा ग्रंथ वाचकांसमोर आलेला आहे. मेंढा गावाच्या ग्रामसभेने या ग्रंथाचे प्रकाशन केलेले आहे. मु. मेंढा (लेखा) पो. हेटी, ता. धानोरा जि. गडचिरोली या आदिवासी गावात मोहन हिराबाई हिरालाल या 'छात्र युवा संघर्ष वाहिनी'च्या सामाजिक कार्यकर्त्यांने मेंढा गावाचा केलेला संपूर्ण विकास अतिशय वाचनीय असाच या ग्रंथात मांडलेला आहे. गांधी-विनोबांनी मांडलेल्या 'ग्रामस्वराज्याची' कल्पना मेंढा गावाने प्रत्यक्षात कशी साकारली; याचा इतिहास म्हणजे हा ग्रंथ होय. मेंढा गावाची ही गोष्ट लेखकाने कशासाठी सांगितली आहे? ज्यांना एरवी आदिवासी म्हणून संबोधले जाते ती आदिवासी माणसे किती शांतपणे, सभ्यपणे आणि निश्चयाने आपले जीवन जगत असतात; ते समाजाला समजावे म्हणून समता, बंधुता, मानवता, स्वातंत्र्य आणि सामाजिक न्यायाची व्यापक मूल्यं या गावाच्या आचार-विचारात कशी समजली आहेत. यातून ग्रामसभेने केलेला आदर्श कारभार हा भारतीय समाजासाठी नवा आदर्श ठरावा. भारतातील खेड्यांत आणि शहरात जागोजागी भरून राहिलेला असहकार, हेकटपणा आणि दुराग्रह मेंढा गावात मात्र आढळत नाही. विज्ञानाने आणि तंत्रज्ञानाने प्रगती झाली असली तरी आपल्या भारतीयांचं समाजजीवन स्वस्थ आणि सुरक्षित नाही. समूहात जगताना आनंदी, निर्भय आणि निरामय जीवनाचा प्रत्यय देणारं मेंढा गाव एक आदर्श उदाहरण आहे. मेंढा या गावाचा सर्वांगीण विकास ग्रामसभेच्या आणि अभ्यासमंडळाच्या व्यापक ध्येयातून झालेला आहे. राजकारणी लोकप्रतिनिधी यांच्यापेक्षा मेंढा गावची ग्रामसभाच सर्वोच्च आहे. ग्रामसभेतील प्रत्येक प्रतिनिधी हा लोकसेवकाच्या भूमिकेतून गावचा कारभार करताना दिसतो.

लोकांच्या हिताचा कारभार करणारी मेंढा गावाची ग्रामसभा खरे स्वशासन अनुभवताना संसदीय लोकशाही बळकट करून लोकांना सक्षम करते आहे. गावाचा विकास आणि प्रगती अनुभवयाची असेल तर मेंढा गाव बघायला हवे; किमान 'गोष्ट मेंढा गावाची' वाचायला हवी.

*लेखक :* मिलिंद बोकील
*प्रकाशक :* ग्रामसभा मेंढा
*पृष्ठे :* १४२
*मूल्य :* रु. १३०



## जगण्याच्या कोलाहलात

प्रसिद्ध कवयित्री आणि लेखिका डॉ. नीलिमा गुंडी यांच्या प्रतिभेतून साकारलेला हा तिसरा कवितासंग्रह. डॉ. नीलिमा गुंडी यांनी विविध वाङ्मय प्रकारात विपुल असं लेखन केलेलं आहे.

बालकविता, बालकथा, कविता, समीक्षा, ललित, वैचारिक, संशोधनपर



अनुक्रमणिका





आणि संपादन अशा विविध अंगांनी समृद्ध लेखन त्यांनी केलेले आहे. 'स्पर्शरेषा' आणि 'प्रकाशाचे अंग' या दोन कवितासंग्रहांतून या आधीच त्या वाचकांना परिचित आहेत.

'जगण्याच्या कोलाहलात' या संग्रहात ५६ कवितांचा




समावेश आहे. चित्रकार राजेंद्र गिरधारी यांचं सुंदर मुखपृष्ठ आणि स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊसची उत्तम आणि सुबक निर्मिती असलेला हा कवितासंग्रह अतिशय देखणा आणि सुंदर झालेला आहे.

कवितेशी असलेले कवयित्रीचे नाते आणि साहित्याचा अभ्यास यामुळे प्राप्त झालेली समृद्ध, व्यापक दृष्टी आणि 'जगण्याच्या कोलाहलात' डोळसपणे कवितेचा सतत शोध घेण्याची ओढ वैयक्तिक अनुभूतीच्या स्तरापुरती उरत नाही.

भोवतालच्या कोलाहलामुळे कवयित्रीच्यां मनात सतत उमटत गेलेले ताणतणावांचे तरंग जसे आहेत, तशीच स्वत:चा आंतरिक स्वर जपण्याचा अविरत प्रयत्नही आहे. बदललेल्या सामाजिक संदर्भामुळे निर्माण झालेली गुंतागुंत आणि अनेक पदरी झालेले जगणे, जागतिकीकरणापासून दहशतवादापर्यंतचे भेडसावणारे सारे संदर्भ जीवनाच्या सहजतेला वेठीस धरीत आहेत.

जगण्याच्या अनेक स्तरांना समृद्धपणे शब्दांत मांडणारी डॉ. नीलिमा गुंडी यांची या संग्रहातली कविता स्त्री-जाणिवांबरोबरच, अस्तित्वाच्या पातळीला अनुभवरूप देऊ पाहाते.

जगण्याचा कोलाहल सतत वाढतोच आहे. या कोलाहलात जगण्याची कोवळीक जपू पाहाणारी डॉ. नीलिमा गुंडी यांची या संग्रहातील कविता वाचकांनी व अभ्यासकांनी वाचलीच पाहिजे.

*कवयित्री :* डॉ. नीलिमा गुंडी

*प्रकाशक :* स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे

*पृष्ठ :* ७२

*मूल्य :* ७०

**मी सामील समूहात**

विख्यात आणि लोकप्रिय कविवर्य प्रा. फ. मु. शिंदे यांच्या निवडक सामाजिक कवितांचा हा संग्रह पुण्यातील सुरेश एजन्सी या प्रकाशनाने नुकताच प्रकाशित केला. प्रतिभावंत चित्रकार रविमुकुल यांचं आशयसंपन्न मुखपृष्ठ आणि पहिल्या विश्व मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष ज्येष्ठ साहित्यिक डॉ. गंगाधर पानतावणे सरांची प्रस्तावना या कवितासंग्रहाला लाभलेली आहे. फ. मु. शिंदे यांच्या कवितांचा अभ्यासपूर्ण परामर्श त्यांनी प्रस्तावनेत नोंदवला आहे. फ. मु. शिंदे यांचा हा २५ वा कवितासंग्रह निवडक ५५ कवितांनी सजलेला आहे.

मानवी पीडा ज्यांच्या अंतर्मनाला भेदून जाते. त्या कलावंतांची निर्मिती सर्वंकष अस्वस्थतेची असते. ही निर्मिती भवतालचं समग्र भान तोलून धरते. ती दु:खाचा उद्गार व्यक्त करते. मानवी जीवनाचा, मनाचा आणि स्वत:चाही तल आणि तोल शोधताना स्वत:चे विचारविश्व निर्माण करते. माणसाच्या सृजनतेला आणि संवेदनशीलतेलाही शब्दरूप देते.

समष्टीच्या दु:खाचे अनेक पोत प्रकाशमान करते. अथांग वास्तवाचा शोध घेताना मनुष्यत्वाची मूल्यात्मता प्रगट करते. जीवनसत्याला सामोरी जाताना माणसातील विसंवादासह इथला माणूस समजून घेते.




कधी चिंतनाच्या तर कधी संवेदनशीलतेच्या अंगाने अनुभवांना जिवंत करते. कवी फ. मु. शिंदे यांची कविता सामान्य माणसांच्या व्यथा-वेदनांना अतिशय प्रभावीपणे वाचकांसमोर मांडते. स्वातंत्र्य, समता, बंधुता, न्याय, लोकशाही, धर्मनिरपेक्षता हे केवळ शब्द नाहीत, तर ती जीवनमूल्ये आहेत.

दुर्बलांना मरणाशिवाय काय दिले आहे स्वातंत्र्याने? कवी फ. मु. शिंदे यांच्या कवितेतला उपरोध सवंग नाही, तर सव्यंग आहे. फ. मु. शिंदे यांनी समाजव्यवस्थेवर उगारलेला आसूड वाचकांना अस्वस्थ करतो. डॉ. गंगाधर पानतावणे आपल्या प्रस्तावनेत पुढे म्हणतात, फ. मु. शिंदे यांच्या अर्थगर्भ, संवेदनशील आणि अंतर्मुख करणाऱ्या 'आई', 'स्पर्शातून', 'मीनाकुमारी' आणि चिवचिव चिमणी या चार कविता म्हणजे चार कोरीव लेणीच आहेत. अशी अनेक कोरीव लेणी या संग्रहात वाचायला मिळतात.

*कवी :* प्रा. फ. मु. शिंदे
*प्रकाशक :* सुरेश एजन्सी, पुणे
*पृष्ठे :* १३६
*मूल्य :* रु. १२०

## वक्तृत्वकला दिग्गजांची

या ग्रंथाचे लेखक श्यामसुंदर दत्तात्रय मुळे हे बार्शीचे आहेत. त्यांच्या नावावर दीपमाळ, नंदादीप, भारतीय स्वातंत्र्याची ५० वर्षे, मानवी मेंदू : एक अद्‌भुत गुहा असे ग्रंथ आहेत. 'वक्तृत्वकला दिग्गजांची' हा ग्रंथ अनुबंध प्रकाशनाने नुकताच प्रकाशित केला आहे. चांगला वक्ता बनण्याचं स्वप्न बाळगणाऱ्या प्रत्येकाला अतिशय उपयुक्त ठरेल असं वक्तृत्वकलेविषयीचं विविध प्रकारचं संकलन या ग्रंथात वाचायला मिळतं. लेखक श्यामसुंदर मुळे हे स्वत: एक चांगले वक्ते आहेत. एका वक्त्यानं आपल्या अनुभवांतून ग्रंथाची केलेली मांडणी मला महत्त्वाची वाटते. त्यांनी स्वत: वक्तृत्वाची केलेली वाटचाल या ग्रंथात सविस्तर वाचायला मिळते. त्यांनी या ग्रंथात दिलेली सगळीच माहिती वक्तृत्वकलेसंदर्भात महत्त्वाची आहे.

या ग्रंथात भाषणांचे प्रकार, असे वक्ते अशी भाषणे, उत्स्फूर्त भाषणे, अग्रगण्य वक्त्यांची गाजलेली भाषणे असे विभाग त्यांनी केलेले आहेत.

अतिशय मेहनतीने आणि अभ्यासपूर्ण मांडणी करण्यात लेखक यशस्वी झालेले आहेत. त्यात वक्तृत्वकला : तंत्र आणि मंत्र, तयारीचे भाषण,



उत्स्फूर्त भाषण, वादविवाद करणारे भाषण, संवाद, मुलाखत या विषयांवर स्वतंत्र प्रकाश टाकला आहे. त्याचबरोबर गाजलेल्या वक्त्यांची भाषणे या ग्रंथात समाविष्ट केलेली आहेत. त्यात स्वामी विवेकानंद, स्वातंत्र्यवीर सावरकर, पंडित जवाहरलाल नेहरू, क्रांतिसिंह नाना पाटील, अटलबिहारी वाजपेयी, आचार्य प्र. के. अत्रे, विन्स्टन चर्चिल, बाळासाहेब ठाकरे, यशवंतराव चव्हाण, डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन, पु. ल. देशपांडे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, बॅ. नाथ पै, अब्राहम लिंकन, कुसुमाग्रज, बाबासाहेब पुरंदरे, प्राचार्य शिवाजीराव भोसले अशा नामवंतांची भाषणे या ग्रंथात वाचायला मिळतात.

एकंदरीत प्रत्येकाला सतत उपयोगी पडेल आणि कायम संग्रही ठेवावा असा ग्रंथ वाचकांनाही आवडल्याशिवाय राहाणार नाही.

*लेखक :* श्यामसुंदर मुळे
*प्रकाशक :* अनुबंध प्रकाशन, पुणे
*पृष्ठे :* २०८
*मूल्य :* १८० रुपये

**शिंपण**

ज्येष्ठ लेखिका ज्योत्स्ना देवधर यांच्या समग्र वाङ्‌मयीन प्रवासाचा आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा उलगडा करणारा 'शिंपण' हा ग्रंथ रामदास भटकळ यांनी संपादित केलेला आहे. ज्योत्स्ना देवधर यांचं वाङ्‌मयीन जीवन किती समृद्ध आहे. याचा सविस्तर परिचय वाचकांना होतो.

कथा, कादंबरी, ललित, स्फुट, नाटक, आत्मकथन, कविता अशा विविध वाङ्‌मय प्रकारांत त्यांनी विपुल लेखन केलेलं आहे. रामदास भटकळ यांच्या प्रस्तावनेतून ज्योत्स्नाबाईंच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि साहित्यिक प्रवासाचा सखोल परिचय होतो.

या ग्रंथाला पहिला विभाग ज्योत्स्ना देवधर यांच्या साहित्याविषयी आहे. त्यात विलास खोले यांनी ज्योत्स्ना देवधर : एक सफल लेखनप्रवास हा लेख अतिशय अभ्यासपूर्ण लिहिलेला आहे.

प्रा. मिलिंद जोशी यांनी अजून माझी उत्सुक ओंजळ, अजून ताजी फुले हा लेख ज्योत्स्ना देवधरांच्या भावविश्वाचा, प्रतिभेचा आणि व्यक्तिमत्त्वाचा समग्र आलेख मांडणारा असा लिहिला आहे. लेखिका स्वाती कर्वे यांनी देवधरांच्या कादंबरीतील स्त्री-प्रतिमा यावर प्रकाश टाकला आहे. कादंबरीकार ज्योत्स्ना देवधर यांच्या चित्रमय शैलीचे दर्शन विनया डोंगरे यांच्या लेखात वाचायला मिळते.




रुपाली शिंदे यांनी देवधरांच्या ललित लेखनाचा परामर्श घेतला आहे. ज्योत्स्ना देवधर यांचे कथाविश्व सविता गोखले यांनी वाचकांसमोर मांडले आहे. वाचकांना अपरिचित असणारी देवधरांची कविता डॉ. नीलिमा गुंडी यांनी वाचकांसमोर आणली आहे. डॉ. संगीता बर्वे यांचा लेखही ज्योत्स्नाबाईंच्या कवितांची अभ्यासपूर्ण ओळख करून देतो.

ज्योत्स्ना देवधर यांचं व्यक्तित्व वाचकांसमोर मांडणारे चंदा नाईक, संजीवनी आपटे, डॉ. न. म. जोशी, श्रीराम मांडे, निर्मला बर्वे, निर्मला कुलकर्णी, मीरा

अरुण शिंदे, स्मिता शेवडे आणि डॉ. मंदा खांडगे यांचे अभ्यासपूर्ण लेख या ग्रंथात वाचायला मिळतात.

'स्वगत' या विभागात स्वत: ज्योत्स्ना देवधर यांनी अनेक विषयांवर स्वत:चं मनोगत आणि हृद्गत वाचकांसमोर सविस्तरपणे ठेवलेलं आहे. वाचकांना आणि अभ्यासकांना अतिशय मार्गदर्शक आणि उपयुक्त ठरणारा हा ग्रंथ आहे.

*संपादक :* रामदास भटकळ

*प्रकाशक :* नवचैतन्य प्रकाशन, मुंबई

*पृष्ठे :* १८४

*मूल्य :* रु. २००

### अस्तोदय

प्रसिद्ध कवी नारायण लाळे यांचा हा दुसरा कवितासंग्रह १९८२ मध्ये प्रकाशित झाला. नारायण सुर्वे, सदानंद रेगे, वसंत आबाजी डहाके हे त्यांचे आवडते कवी. 'अस्तोदय' या संग्रहात त्यांच्या ८३ कविता वाचकांना वाचायला मिळतात.

प्रसिद्ध कवी अशोक बागवे यांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना या संग्रहाला लाभलेली आहे. मानवी जीवनातील गहनगूढ उकलून दाखवणे हाच तर प्रतिभेचा ध्यास असतो. कवी नारायण लाळे यांचा 'अस्तोदय' हा कवितासंग्रह आस्वादताना 'मृत्यू' या गूढाची उकल करण्यात कवीची प्रतिभा गुंतली असली तरी वाचकांना मात्र वेगळ्या भावविश्वाचे आणि जाणिवांचे दर्शन घडविते. मृत्यू हा जीवनाचा पूर्णविराम नसून तो स्वल्पविराम आहे. संतांनी केलेल्या वाङ्मयाचे संस्कार समकालीन कवितेवर आहेत. कवी नारायण लाळे यांच्या कवितेवरही हा संत वाङ्मयाचा संस्कार दिसून येतो. 'अस्तोदय' मधील बहुतांश कवितांना मृत्यूविषयीच्या विचारांची आवर्त आणि चिंतनाची आध्यात्मिक डूब लाभली आहे. जीवनाचा अस्त हाच जीवनाचा उदय आहे. हे भाष्य अधोरेखित करणारी कवी नारायण लाळे यांची कविता वाचकांपासून समीक्षकापर्यंत सर्वांनाच नवा विचार देणारी आहे. समाजजीवन आणि समाजमन यांचा शोध घेतानाच मानवी अस्ताचा आणि मानवी उदयाचा चिंतनशील शोध घेणारी ही कविता अभ्यासनीय आणि वाचनीय झालेली आहे.

*....''आता काळोखाला खणावे लागेल*
*आणि शोधावे लागतील प्रकाशाचे झरे''*

अंधार आणि प्रकाशाची खोलवर जाणीव या कवितेच्या




मुळाशी आहे. जीवनाइतकाच मरणाचा शोध घेणारी कविता आदिम काळोखाच्या उदरांत प्रकाशाचे तेजस्वी झोतही आहेत हे सांगते. अंधार-उजेडाचा शोध घेताना जीवनाचे श्रेय आणि प्रेय सांगणारी ही कविता वाचनीय आहे; यात शंका नाही.

*कवी :* नारायण लाळे

*प्रकाशक :* डिम्पल पब्लिकेशन, ठाणे

*पृष्ठे :* ९६

*मूल्य :* १०० रु.

### आक्रंदन

योगीराज वाघमारे यांनी या कादंबरीच्या रूपानं एक अतिशय महत्त्वाचा आणि आजच्या वर्तमानात जिव्हाळ्याचा असलेला विषय वाचकांसमोर ठेवलेला आहे. दलित, उपेक्षित, वंचित आणि शोषितांची दु:खं आपल्या लेखनातून मांडणारे योगीराज वाघमारे यांनी कादंबरीत मात्र पशु-पक्षी आणि वन्यप्राण्यांच्या जीवघेण्या




वास्तवाला मांडले आहे.

जुना काळ आणि आजचा काळ यांचा तुलनात्मक विचार करताना पर्यावरणाचा होत गेलेला ऱ्हास, संपत जाणारी वनसंपत्ती आणि भकास, उदास झालेली खेडी यांचा अतिशय समर्पक शैलीत घेतलेला वेध या कादंबरीत वाचायला मिळतो.

पूर्वीचे दिवस आढळतात, दारावर पक्षी, झाडावर पक्षी, पाणवठ्यावर पक्षी, नदीवर गुरं, ढोरं, पक्षी नाना रंगाचे, नाना प्रकारचे पक्षी आणि वन्यजीव भेटायचे. फुलपाखरं, मधमाश्या, साप, मुंगूस यांचे दर्शन व्हायचे. चिमण्या, पाखरं, साळुंक्या यांचा कलकलाट व्हायचा.

खोकडं, तरस खेकसायची, कोल्हेकुई व्हायची. तर कुरणात हरणाचा कळप दिसायचा. एखादा लांडगा यायचा मेंढीला पळवून न्यायचा.

काळाच्या ओघात सारं काही बदलून गेलं. जंगल झपाट्यानं नष्ट झालं. वन्यजीवाच्या क्षेत्रात माणसाचं आक्रमण वाढलं आहे. वन्यजीवांचा आश्रय माणूस हिरावून घेतोय. दारातली, वावरातली, माळावरली समदी झाडं कुणी कापली? माणसानं झाडं तोडली म्हणून इथलं पशु-पक्षी परागंदा झालं.

आता खेडं मात्र वेदनांनी कण्हतं आहे. दारातल्या, भवतालच्या जितराळासाठी मनातल्या मनात रडतं आहे. खेड्यांची भयावह अवस्था, माणसांमधली उदासीनता, प्राण्यांबद्दलचा आकस आणि झाडाविना बुचंबुचं वाटणारं सारं गावकुस या कादंबरीत जसंच्या तसं उभं करण्यात लेखक यशस्वी झाले आहेत. 'आक्रंदन' ही कादंबरी आजच्या वर्तमानाचे असंख्य प्रश्न घेऊन वाचकांसमोर आलेली आहे.

लेखकानं मांडलेलं सामाजिक चिंतन आणि त्यातून समोर आलेले प्रश्न यावर समाजाकडे उत्तरं आहेत, की नाहीत? समाजाला याची उत्तरं द्यावी लागतील.

*लेखक :* योगीराज वाघमारे

*प्रकाशक :* संकेत प्रकाशन, नागपूर

*पृष्ठे :* १२८

*मूल्य :* रु. १००

**धरणगाणी**

कवी गोविंद काळे हे सोलापूरचे कवी आहेत. त्यांचा हा आगळावेगळा अनुभवपट 'धरणगाणी' कवितासंग्रहाच्या रूपाने अक्षर मानव प्रकाशनाने नुकताच प्रकाशित केला आहे. चित्रकार गिरीश सहस्रबुद्धे यांचं देखणं मुखपृष्ठ आणि प्रसिद्ध कवी हेमकिरण पत्की यांची अभ्यासपूर्ण आणि आस्वादक प्रस्तावना या संग्राहाला लाभली आहे.

गोविंद काळे यांचं हे पाचवं पुस्तक वाचकांसमोर आलेलं आहे. कविवर्य नारायण सुर्वे नेहमी सांगत होते; मराठी कविता सर्व अंगाने लिहिली गेली पाहिजे. विविध अनुभवांतून कवी हा घडला पाहिजे. वाचन, अभ्यास, चिंतन आणि अनुभव यांतूनच कसदार कविता निर्माण होऊ शकते. गोविंद काळे या कवीचं अनुभवविश्व अतिशय समृद्ध आहे. पाटबंधारे खात्यात काम करताना त्यांना आलेले प्रचंड बोलके अनुभव त्यांनी या संग्रहात मांडले आहेत.

धरणाच्या उभारणीसाठी अडवले जाणारे प्रवाह, त्यांची भव्यता, उदात्तता आणि त्यातून समाजाला होणारा लाभ, उपद्रव अशा विविध विचारांच्या संवेदनशील लाटांवर कवीचे मन हेलकावताना अतिशय भावपूर्ण शब्दांत अभिव्यक्त झाले आहे. मानवजातीचे कल्याण

व्हावे, सुख माणसापर्यंत पोहोचावे म्हणून अभियंत्यापासून शिपायापर्यंत चालणारी सर्वांची अथक धडपड कवीने आपल्या प्रतिभेतून कवितेत उतरवली आहे. प्रकल्पांकित जीवनाचा अर्थ शोधणारी नवा बंध आणि बोध सांगणारी आणि जीवनतत्त्वाशी एकरूप होणारी गोविंद काळे यांची कविता दखल घ्यावी अशीच आहे. 'धरणगाणी' अनुभवताना कवीनं अनुभवातलं उमगलेलं शहाणपण शब्दांतून सहजपणे वेचून घेतल्याचं जाणवतं.




अनुभवांचा जलाशय कवितेच्या माध्यमातून प्रवाहित करणारा हा कवी नव्या जाणिवा, नव्या प्रतिमा आणि नवे विषय वाचकांना देतो. धरणाच्या भिंतीत त्रस्त झालेलं कविमन मानवी नात्याचे बंधारे बांधण्यात यशस्वी झाले आहे. कवीचं मन म्हणजे त्याच्या प्रतिभेचं निर्मळ पाणी आहे. ते कुणाला अडवता येणार नाही. कारण त्यांच्या सूक्ष्म जाणिवांची सळसळ कवितेचे पंख लावून त्यातून नवे आकाश शोधू पाहाते आहे.

*कवी :* गोविंद काळे
*प्रकाशक :* अक्षर मानव प्रकाशन, पुणे
*पृष्ठे :* ६४
*मूल्य :* रु. ६०

◇◇◇

---

**नवीन आजीव सभासद**

शिंदे उद्धव महादेव
लींबकर उमाकांत दत्तात्रय
घावटे आबासा मारुती
वैद्य सोमनाथ दिगंबर
कदम राजेश रावसो, पुणे
फडतरे माधुरी रमेश, पुणे
चौगुले संभाजी दगडू, पुणे
भोसले बाबासाहेब आनंद, पुणे
फडतरे रमेश आनंदराव, पुणे
साने सायली दीपक, ठाणे
काळे मोहन मारुती, ठाणे
गद्रे भारती सुहास, ठाणे
उताणे राजेश, चिखली
जाधव सुरेखा हरीं, आडगांव
चव्हाण बापू धोंडीराम, पुणे
कुलकर्णी पद्मजा बाळासाहेब, सोलापूर
नाटकर आशुतोष सदाशिव, सोलापूर
पुडले सुवर्णा जयंत, पुणे
पाटणकर किरण श्रीकांत, सोलापूर
शेटे चेतन विश्वास, पुणे
जोगळेकर अरविंद वसंतराव, पुणे
हेंबाडे भगवान नागनाथ, सोलापूर
गाढवे योगिता विकास, खंडाळ
भोसले वासंती मोहन, शिरवळ
देशमुख राजेंद्र गजानन, शिरवळ
पवार भिकू सुरेश, खंडाळा
सोळस्कर लक्ष्मण बाळकृष्ण, घाटदरे
जगदाळे छाया बाळकृष्ण, खंडाळा
ढमाल चंद्रकांत मारुती, खंडाळा
सावंत सुभाष रामचंद्र, खंडाळा
भोसले रवींद्र पांडुरंग
देसाई उत्तम बापूजी
बोंद्रे लक्ष्मण गोवर्धन
काटकर बाळासाहेब पंढरीनाथ
अहिवळे भारत माधव
ठोंबरे केशव सिलेमात
नेरकर वामन अच्युत
शहा दिनेश नेमचंद्र
जाधव सुनीता गुलाबराव
गायकवाड निलम मनोहर
अभंग भानूदास केशवराव
सुखसे विजया काशिनाथ
तगारे स्नेहल मंसुर
शिंदे जयकुमार दत्तात्रय
दीक्षित विजया प्रकाश
नाळे महादेव तुकाराम
मोहिते नानासाहेब विठ्ठल
कुलकर्णी वृंदा सुरेश
भोसले मृणाल यशपाल
ठोक प्रमिला रामचंद्र
शिंदे बाबुराव सायळू
कुलकर्णी उषा उपेंद्र
नाळे रवींद्र दिनकर
जाधव जयश्री विलासराव
धनवट प्रकाश दत्तात्रय
मेढकरी शाबेराव मंजेखान
माने अशोक नारायण
मोदी अमीजभाई मोनीभाई
भट्टड आरती बालमुकुंद
इंगोले संजयकुमार, रत्नागिरी
गायकवाड अंबादास ऊर्फ प्रशांत, सोलापूर
शालीग्राम भंडारी, तळेगाव
कुलकर्णी शमा शशांक, तळेगाव
फडके दत्तात्रय मधुसूदन, तळेगाव
शहा शर्मिला संजय, तळेगाव
होनप मोरेश्वर केशव, तळेगाव

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शहर कार्यवृत्त नोंद



(१ सप्टेंबर २०१२ ते १५ डिसेंबर २०१२)

## – पुणे शहर –

**१) दि. १२ सप्टेंबर २०१२**

'नवं कोरं' या उपक्रमात नीलिमा बोरवणकर लिखित 'निजखूण' या कादंबरीवर चर्चा आयोजित केली होती. प्रमुख पाहुण्या म्हणून विद्या बाळ उपस्थित होत्या. चर्चेत वक्ते म्हणून प्रा. मिलिंद जोशी यांनी भाग घेतला. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. बाळ, बोरवणकर व जोशी यांचे स्वागत व सत्कार कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी केला. कार्यकारिणी सदस्य डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रमुख पाहुण्यांचा परिचय करून दिला. नीलिमा बोरवणकर यांनी 'निजखूण' कादंबरीविषयी लेखिकेची भूमिका मांडली. त्यानंतर 'निजखूण' मधील उताऱ्याचे वाचन कार्यवाह नंदा सुर्वे यांनी केले. त्याचबरोबर कादंबरीचे प्रकाशक 'मॅजेस्टिक प्रकाशना'चे श्री. अशोक कोठावळे यांच्या पत्राचे वाचन नंदा सुर्वे यांनी केले. चर्चेचा समारोप विद्या बाळ यांनी केला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह नंदा सुर्वे यांनी व आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

**२) दि. १८ सप्टेंबर २०१२**

'नवं कोरं' या उपक्रमात लेफ्टनंट कर्नल (निवृत्त) प्रफुल्ल जोशी यांनी लिहिलेल्या 'कर्नल नावाचा माणूस' या पुस्तकावर चर्चा व त्यातील निवडक उताऱ्यांचे वाचन असा कार्यक्रम झाला. व्यापीठावर अध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, प्रमुख पाहुणे ज्येष्ठ रंगकर्मी विक्रम गोखले, वक्ते, संजय आरवीकर, प्रकाश पायगुडे, प्रकाशक अरुण जाखडे, लेखक जोशी व प्र. कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी उपस्थित होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रस्ताविक, स्वागत व सत्कार केले. लेखक जोशी यांनी पुस्तकामागची भूमिका विशद केली. विक्रम गोखले यांनी आपले मनोगत व्यक्त केले. संजय आरवीकर व प्रकाश पायगुडे यांनी चर्चेत भाग घेतला. या पुस्तकातील काही निवडक उताऱ्यांचे वाचन डॉ. मेधा खाजगीवाले यांनी केले. अरुण जाखडे यांनी प्रकाशकाची भूमिका सांगितली. अध्यक्षीय समारोप डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांनी केला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले व कार्यवाह नंदा सुर्वे यांनी आभार मानले.

**३) दि. ४ ऑक्टोबर २०१२**

**पारितोषिक वितरण समारंभ : परिक्षा विभाग**

परिषदेच्या, फेब्रुवारी २०१२ मध्ये घेण्यात आलेल्या प्रथमा, प्रवेश, साहित्य प्राज्ञ व साहित्य विशारद या परीक्षांत प्रथम-द्वितीय व तृतीय क्रमांकाने उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांचे सत्कार, परिषदेचे अध्यक्ष व समारंभाचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते करण्यात आला. यशस्वी विद्यार्थ्यांची नावे, शाळेचे नाव खालीलप्रमाणे :

प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले, परीक्षा विभाग प्रमुख सौ. सुनीताराजे पवार यांनी परीक्षेसंबंधी माहिती दिली. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी आपले विचार व्यक्त केले. डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले.

**४) दि. ११ ऑक्टोबर २०१२ : नवं कोरं :** कवी फ. मुं. शिंदे यांच्या 'मी सामील समूहात' या कविता संग्रहावर चर्चा आयोजिली होती. रामदास फुटाणे व अरुण खोरे यांनी चर्चेत सहभाग घेतला. प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी केले. प्रमुख पाहुणे



अनुक्रमणिका

| परीक्षेचे नाव | विद्यार्थ्याचे नाव | शाळेचे नाव व गाव | परीक्षेतील क्रमांक |
|---|---|---|---|
| प्रथमा | राजळे श्वेता दिगंबर | शारदाबाई पवार महिला महाविद्यालय, बारामती | प्रथम |
| प्रथमा | कचरे काजल दशरथ | शारदाबाई पवार महिला महाविद्यालय, बारामती | द्वितीय |
| प्रथमा | चोपडे मृणालिनी महादेव | शारदाबाई पवार महिला महाविद्यालय, बारामती | तृतीय |
| प्रथमा | मिंडे अनुजा संभाजी | प्रियदर्शनी हायस्कूल, भोसरी | विभागून |
| प्रथमा | गोयल वरुण प्रवीण | प्रियदर्शनी हायस्कूल, भोसरी | |
| प्रवेश | कारंडे सौरभ अंकुश | विद्याप्रतिष्ठान बालविकास मंदिर, बारामती | प्रथम |
| प्रवेश | कोठारी प्रतिक प्रदीप | टिळकनगर विद्या मंदिर, डोंबिवली | द्वितीय |
| प्रवेश | पवार किशोर सागर | ज्ञानेश माध्यमिक विद्यालय, पुणे | |
| | गालिंदे स्वप्ना दिनेश | विद्याप्रतिष्ठान बालविकास मंदिर, बारामती | तृतीय |
| | पालकर प्राजक्ता संतोष | अहिल्यादेवी हायस्कूल, पुणे | तृतीय |
| साहित्यप्राज्ञ | हळंदे शुभांगी समीर | अहिल्यादेवी हायस्कूल, पुणे | प्रथम |
| साहित्यप्राज्ञ | उंबेकर देवकी श्रीपाद | अहिल्यादेवी हायस्कूल, पुणे | द्वितीय |
| साहित्यप्राज्ञ | कल्याणपूर सुवर्णा समीर | अहिल्यादेवी हायस्कूल, पुणे | तृतीय |

म्हणून सुरेश एजन्सीचे बाळासाहेब कारले उपस्थित होते. प्रा. मिलिंद जोशी व सुनील महाजन यांचे हस्ते पुष्पगुच्छ देऊन व्यासपीठावरील मान्यवरांचे स्वागत करण्यात आले. तसेच शैलेंद्र कारले यांनी प्रकाशकांतर्फे स्वागत व सत्कार केले. श्री. बाळासाहेब कारले यांनी प्रकाशकाचे मनोगत व्यक्त केले. चर्चेच्या शेवटी प्रा. फ. मुं. शिंदे यांनी आपले मनोगत व्यक्त केले. सूत्रसंचालन उद्धव कानडे व आभार प्रदर्शन प्रा. मिलिंद जोशी यांनी केले.

**५) दि. १७ ऑक्टोबर २०१२ : कै. विद्याधर पुंडलिक स्मृतिसाहित्य पुरस्कार :** यशवंतराव गडाख यांच्या 'अंतर्वेध' पुस्तकाला कै. विद्याधर पुंडलिक यांच्या नावे दिला जाणारा पुरस्कार भानू काळे यांच्या हस्ते देण्यात आला. अध्यक्षस्थानी विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष ॲड. भास्करराव आव्हाड होते. यावेळी व्यासपीठावर परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे होते. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. पुष्पगुच्छ देऊन मान्यवरांचे स्वागत करण्यात आले. कै. पुंडलिकांचा नातू साहिल पुंडलिक याने शारदा स्तवन व पसायदान सादर केले. रागिणी पुंडलिक, कोषाध्यक्ष सुनील महाजन हे उपस्थित होते. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी 'अंतर्वेध' पुस्तकाविषयी मनोगत व्यक्त केले. परिषदेच्या विश्वस्त मंडळाचे सदस्य उल्हास पवार यांनीही मनोगत व्यक्त केले. यशवंतराव गडाख यांनी पुरस्कार स्वीकारल्यावर आपले विचार प्रकट केले. भानू काळे, डॉ. रावसाहेब कसबे, निर्मला सोही यांनी आपले विचार प्रकट केले. ॲड. आव्हाड यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह प्रकाश पायगुडे व आभार प्रदर्शन कार्यवाह ॲड. प्रमोद आडकर यांनी केले.

**६) दि. १९ ऑक्टोबर २०१२ :** परिषदेने बालकुमारांसाठी १०६ वर्षांच्या इतिहासात यंदा प्रथमच 'मज्जाच मजा' हा दसरा-दिवाळी विशेषांक काढला. या अंकाचे प्रकाशन केंद्रीय कृषिमंत्री नामदार शरदराव पवार व विधानसभेचे अध्यक्ष मा. दिलीप वळसे पाटील यांच्या शुभहस्ते बालगंधर्व नाट्यगृहात झाले.

यावेळी मा. ना. धों. महानोर, मोहन धारिया, मा. सा. रे. तथा अप्पासाहेब पाटील, महापौर वैशाली बनकर, मा. अंकुशराव काकडे, उद्योजक बाबा कल्याणी हे मान्यवर उपस्थित होते. तसेच परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, प्र. का. प्रा. मिलिंद जोशी व कोशाध्यक्ष सुनील महाजन, उपस्थित होते.

**७) दि. २२ ऑक्टोबर २०१२ : ग्रंथालय विभाग :** सरस्वतीपूजन – पदाधिकारी व ग्रंथालयातील सेवकवर्ग यांच्या उपस्थितीत सकाळी १० वा. सरस्वतीपूजन करण्यात आले.

**८) दि. २५ ऑक्टोबर २०१२ : कै. दत्तो वामन पोतदार पुरस्कार वितरण समारंभ :** 'फ्रेंच मराठा संबंध १६६८-१९१९' या ग्रंथाचे लेखक डॉ. उमेश अशोकराव कदम यांना महामहोपाध्याय डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांच्या हस्ते कै. द. वा. पोतदार यांच्या नावाने दिला जाणारा पुरस्कार प्रदान करण्यात आला. डॉ. सदाशिव शिवदे व पांडुरंग बलकवडे हे दोघे परीक्षक होते. कार्यवाह प्रकाश पायगुडे निमंत्रक होते. समारंभाचे सूत्रसंचालन प्रकाश पायगुडे व आभार प्रदर्शन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले.

**९) दि. १ नोव्हेंबर २०१२ : ज्येष्ठ साहित्यिक कवयित्री कै. योगिनी जोगळेकर स्मृतिदिन : पाहिले पाऊल :** ज्या कवींचा पहिला कवितासंग्रह २०११-१२ या वर्षात प्रसिद्ध झालेला आहे. अशा कवींना निमंत्रित करून त्यांचे बहारदार कवी संमेलन आयोजित करण्यात आले. कै. योगिनी जोगळेकर यांनी रचलेले व स्वरबद्ध केलेले 'शारदा स्तवन ऊर्मिला भांबुरकर यांनी प्रारंभी सादर केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी निमंत्रित कवींचे स्वागत केले. सादर केले. सागर काकडे, श्यामला जोशी, जयश्री घुले, नलिनी दर्शने, किशोर टिळेकर, अभिजित कर्वे, अरुणा गोखले, चंद्रशेखर धर्माधिकारी, मंगला म्हैसकर, अंजली महागांवकर, रेवा लिमये, रवींद्र कुलकर्णी, मनीषा आवेकर, जयवंत हापन या कवींनी आपापल्या कविता सादर केल्या. कवी संमेलनाचे सूत्रसंचालन विजय सातपुते यांनी केले. व्यासपीठावर सुधन्वा जोगळेकर, डॉ. वैद्य, व प्रा. मिलिंद जोशी उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

**१०) दि. २ नोव्हेंबर २०१२ : नवनिर्वाचित साहित्य संमेलनाध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचा सत्कार :** परंपरेनुसार साहित्यसंमेलनाध्यक्षांचा निवडून आल्यानंतर पहिला जाहीर सत्कार महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे केला जातो. परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचा सत्कार करण्यात आला. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचा परिचय करून दिला. त्यानंतर डॉ. कोत्तापल्ले यांचा अनेक सामाजिक, सांस्कृतिक, साहित्यिक संस्थांनकडून सत्कार करण्यात आला. डॉ. रावसाहेब कसबे, अरुण जाखडे, अनिल कुलकर्णी यांनी या प्रसंगी आपले विचार प्रकट केले. या प्रसंगी परिषदेच्या अंगणात सुंदर रांगोळी घालण्यात आली होती व श्री. रमेश पाचंगे व सहकारी यांचे चौघडावादन झाले. डॉ. कोत्तापल्ले यांनी सत्काराला उत्तर दिले. अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार प्रदर्शन केले व उद्धव कानडे यांनी सूत्रसंचालन केले.

**११) दि. ७, ८ व ९ नोव्हेंबर २०१२ :** महाराष्ट्र साहित्य परिषद आणि पुणे बुक फेअर पुस्तक प्रदर्शनानिमित्त साहित्यिक कार्यक्रम : या वर्षी म. सा. प.च्या माधवराव पटवर्धन सभागृहात या निमित्ताने तीन दिवस साहित्यिक कार्यक्रम झाले. दि. ७ नोव्हेंबर रोजी कवी केशवसुत स्मृतिदिनानिमित्त डॉ. नीलिमा गुंडी यांचे 'केशवसुतांची कविता : एक समृद्ध वारसा' या विषयावर व्याख्यान झाले. दि. ८ नोव्हेंबर रोजी श्याम भुर्के व गीता भुर्के यांचा 'आनंदयात्री पु. ल.' हा कार्यक्रम झाला. दि. ९





अनुक्रमणिका

नोव्हेंबर रोजी 'संवेदना २०१२' हा परिषदेचा दुसऱ्या वर्षीचा दिवाळी अंक डॉ. न. म. जोशी यांच्या हस्ते प्रकाशित करण्यात आला. तसेच यशवंतराव चव्हाण जन्मशताब्दीनिमित्त डॉ. जोशींचे 'आठवणीतले यशवंतराव चव्हाण' या विषयावर व्याख्यान झाले. दि. ७ नोव्हेंबर २०१२ रोजी सकाळी 'पुणे बुक फेअर'च्या पुस्तक प्रदर्शनाचे उद्घाटन नवनिर्वाचित संमेलनाध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या हस्ते प्रदर्शनस्थळी गणेश कला क्रीडा मंच येथे झाले. या तीनही दिवसांचे सूत्रसंचालन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले. याच कार्यक्रमात लेखिका डॉ. ललिता कुंभोजकर व साहित्यसेवक श्रीधर सहस्रबुद्धे यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**१२) दि. १० नोव्हेंबर २०१२ : आजी-आजोबांच्या गोष्टी :** डी. एस. के. विश्व, धायरी येथे 'आजी-आजोबांच्या गोष्टी' हा अभिनव उपक्रम आयोजित करण्यात आला. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य व साहिल शेणई यांनी कथा सादर केल्या. डॉ. द. भि. कुलकर्णी, डी. एस. कुलकर्णी, यांची विशेष उपस्थिती होती याचवेळी 'ग्रंथविश्व' मोफत वाचनालयाचे उद्घाटन झाले.

**१३) दि. १७ नोव्हेंबर २०१२ : आजी-आजोबांच्या गोष्टी :** ज्येष्ठ नागरिक संघ, वारजे येथे बालकुमारांसाठी डॉ. न. म. जोशी व डॉ. माधवी वैद्य यांनी गोष्टी सांगितल्या.

**१४) दि. २९ नोव्हेंबर व ३० नोव्हेंबर २०१२ : पहिले समीक्षक संमेलन : दि. २९ नोव्हेंबर २०१२ : उद्घाटन समारंभ :** प्रा. के. रं. शिरवाडकर यांच्या उपस्थितीत या संमेलनाचे उद्घाटन दीपप्रज्वलन करून झाले. यावेळी व्यासपीठावर डॉ. द. भि. कुलकर्णी, प्रा. वसंत आबाजी डहाके, डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. माधवी वैद्य, प्रा. मिलिंद जोशी, सुनील महाजन उपस्थित होते. कार्यकारिणी सदस्य डॉ. कल्याणी दिवेकर यांनी सूत्रसंचालन केले. प्रा. शिरवाडकर यांचे 'साहित्य समाज व संस्कृती' या विषयावर बीजभाषण झाले. नंतर प्रा. डहाके यांचे 'रूपवादी व सौंदर्यवादी समीक्षा-सामाजिक व सांस्कृतिक स्वरूपात' या विषयावर भाषण झाले. **दि. ३० नोव्हेंबर २०१२ :** सकाळच्या सत्रात प्रा. सुजाता शेणई यांनी 'नियतकालिकातील कविता', डॉ. रेखा साने-इनामदार यांनी लोकप्रिय कादंबरी, डॉ. नीलिमा गुंडी यांनी 'मराठी आधुनिक काव्यातील



नवनिर्वाचित साहित्य संमेलनाध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचा मसापच्यावतीने सत्कार करताना डॉ. प्र. चिं. शेजवलकर सोवत डॉ. माधवी वैद्य, प्रा. मिलिंद जोशी आणि सुनिल महाजन.




मसापच्यावतीने आयोजित समीक्षकांचे पहिले संमेलन प्रा. के. रं. शिरवाडकर यांच्या अध्यक्षतेखाली झाले. उद्घाटन प्रसंगी प्रा. वसंत आबाजी डहाके, डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. द. भि. कुलकर्णी, प्रा. मिलिंद जोशी आणि सुनील महाजन.



**मसाप बार्शी शाखा ८ जुलै २०१२ :** मसाप बार्शी शाखा आणि श्री. शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित कार्यक्रमात प्रा. मिलिंद जोशी यांच्या 'पानगळ' या कथासंग्रहाचे प्रकाशन प्रा. वसंत आबाजी डहाके यांच्या हस्ते झाले. त्यावेळी वैजनाथ महाजन, रविंद्र बेडकीहाळ, पद्माकर कुलकर्णी, सुनिताराजे पवार, प्रा. डहाके, प्रा. व. न. इंगळे, पां. न. निपाणीकर, डॉ. बी. वाय यादव आणि प्रा. जोशी व्यासपीठावर उपस्थित होते. या कार्यक्रमात प्रा. राजेंद्र दास यांनी पुस्तकाविषयीचे मनोगत व्यक्त केले. मुकुंदराज कुलकर्णी यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.



अनुक्रमणिका

सांस्कृतिक परिवर्तने' या विषयांवरचे आपले निबंधवाचन केले. त्यावर खुली चर्चा झाली. या सत्राचे सूत्रसंचालन कार्यवाह नंदा सुर्वे यांनी केले. दुपारी भोजनानंतर डॉ. मनोहर जाधव यांनी 'गेल्या अर्ध शतकातील दलित साहित्यातील स्थित्यंतरे', डॉ. मंगला आठलेकर यांनी 'स्त्रीवादी साहित्य परंपरा आणि स्वातंत्र्य' या विषयांवरील आपले निबंधवाचन केले. यावेळी विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष सहभागातून समीक्षाविषयक चर्चा झाली. अध्यक्षीय समारोप प्रा. के. रं. शिरवाडकर यांनी केला. या सत्राचे सूत्रसंचालन उद्धव कानडे व कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. हे दोन दिवसांचे 'पहिले समीक्षक संमेलन' माधव ज्युलियन यांच्या स्मृतीस अर्पण करण्यात आले.

**१५) दि. १ डिसेंबर २०१२ : कविवर्य माधव ज्युलियन स्मृतिनिमित्त द्वैभाषिक मुशायरा :** सय्यद आसिफ यांच्या अध्यक्षतेखाली व कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या उपस्थितीत झाला. या द्वैभाषिक मुशायऱ्याचे सूत्रसंचालन सुरेशचंद्र सुरतवाला यांनी बहारदारपणे केले. काझी, हिसामुद्दीन शोला, रमण रणदिवे, इलाही जमादार, दीपक करंदीकर, संगीता जोशी, प्रदीप निफाडकर व अध्यक्ष शायर सय्यद आसिफ यांनी आपापल्या गझला सादर केल्या. गझलेच्या रसिक श्रोत्यांच्या उपस्थितीत हा मुशायरा उत्तरोत्तर रंगत गेला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह दीपक करंदीकर व आभार प्रदर्शन कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले.

**१६) दि. १० डिसेंबर २०१२ : प. पू. परमहंस स्वामी स्वरूपानंद स्मृतिव्याख्यान :** श्री. राजाभाऊ दिवाण यांचे 'स्वामी स्वरूपानंदांच्या विचारांची सहजता, सुलभता' या विषयावर व्याख्यान झाले. यानिमित्ताने स्वामी स्वरूपानंद सेवा मंडळाचे विश्वस्त श्री. मामा घळसासी यांच्या हस्ते श्री. दिवाण यांचा शाल, श्रीफल, 'वारकरी संप्रदायाची अभंग-ज्ञानेश्वरी' व पावसचा प्रसाद देऊन सत्कार करण्यात आला. तसेच श्री. मधू पटवर्धन यांनी शाल अर्पण करून श्री. दिवाण यांचा सत्कार केला. डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत, सत्कार व प्रास्ताविक केले. व्यासपीठावर सेवामंडळाचे अध्यक्ष वसंतराव देसाई, विश्वस्त मामा घळसासी व मधू पटवर्धन, वक्ते श्री दिवाण व कार्याध्यक्ष डॉ. वैद्य हे होते. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी श्री. दिवाण यांचा परिचय करून दिला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले.

◇◇◇







अनुक्रमणिका

## – शाखा कार्यवृत्त नोंद –

**१) म.सा.प. पिंपरी-चिंचवड शाखा**

**दि. २१ ऑक्टोबर २०१२ : खुली राज्यस्तरीय काव्यस्पर्धा :**

नगरसेवक राजाभाऊ गोलांडे यांच्या हस्ते स्पर्धेचे उद्‌घाटन झाले व समारोप प्रमुख पाहुणे डॉ. पानवलकर यांनी केला. प्रास्ताविक शाखा अध्यक्ष राजन लाखे यांनी केले. स्पर्धेत राज्यभरातील ५२ कवींनी सहभाग नोंदवला. विजेत्यांना डॉ. पानवलकर यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली.

**दि. १२ नोव्हेंबर २०१२ : दिवाळी काव्यपहाट :**

आमदार लक्ष्मण जगताप हे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. अध्यक्षस्थान डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांनी भूषविले. अध्यक्ष राजनलाखे यांनी शारदा-स्तवन व प्रास्ताविक सादर केले. डॉ. राजेंद्र कांकरिया यांनी कविसंमेलनाचे सूत्रसंचालन केले. ६५ कवींचा यात सहभाग होता. सुहास पोफळे, तुकाराम पाटील, नितीन यादव, संजय खानोलकर, संजय जगताप यांनी संयोजनात मदत केली.

**२) म.सा.प. वारजे-कोथरूड शाखा : दि. २४ ऑगस्ट २०१२ :**

'आजचे प्रश्न आणि संतसाहित्य' या विषयावर डॉ. अविनाश आवलगावकर यांचे व्याख्यान झाले. डॉ. अश्विनी धोंगडे अध्यक्षस्थानी होत्या. डॉ. वसुधा कर्दळे यांनी आभार मानले

**दि. ६ ऑक्टोबर २०१२ :**

सौ. अनघा ठोंबरे यांचे 'बहिणाबाईच्या लेकी' या विषयावर व्याख्यान झाले.

**दि. २५ नोव्हेंबर २०१२ :**

डॉ. न. म. जोशी यांचे 'एकविसाव्या शतकातील आव्हाने' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यवाह गोपाळ कुलकर्णी यांनी आभार मानले.

**३) म.सा.प. जुळे सोलापूर शाखा : दि. ५ जून २०१२ :**

स्मृतिवनात काव्यशलाकाचे उद्‌घाटन हिंमतराव देशभ्रतार यांच्या हस्ते वृक्षारोपण करून झाले. 'निसर्ग कविता' मैफलीत डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली, नारायण कुलकर्णी,







हेमकिरण पत्की, डॉ. माधवी रायते यांनीं सहभाग घेतला. अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते, पद्माकर कुलकर्णी, जे. जे. कुलकर्णी, बाबूराव पेठकर, चंद्रिका चौहान उपस्थित होते.

**दि. ९ जून २०१२ : दत्ता हलसगीकर यांना श्रद्धांजली :**

डॉ. रायते, नारायण कुलकर्णी, गिरीश दुनाखे, शांताबाई क्षीरसागर यांनी विचार प्रकट केले.

**दि. ८ जुलै २०१२ :**

कार्याध्यक्ष सुधाकर जोशी यांच्या 'तरंगातून उमटलेले' या लेखसंग्रहाचे प्रकाशन ह. मो. मराठे यांच्या हस्ते झाले. अध्यक्ष म्हणून दै. संचार चे धर्मराज कडादी उपस्थित होते.

**दि. ७ ऑगस्ट २०१२ : कै. दत्ता हलसगीकर जयंती :**

स्मृतिवनात वृक्षारोपणाने हलसगीकर परिवाराच्या सहयोगाने आयोजित करून साजरी झाली.

आठवणींना उजाळा विविध वक्त्यांनी दिला व कवितावाचन झाले.

**दि. १२ ऑगस्ट २०१२ :**

**'शुभंकराचा सांगाती'** हा कै. दत्ता हलसगीकरांच्या कवितांवर आधारित कार्यक्रम समाराधन संस्थेच्या रजनीश जोशी, सुनिल गुरव, अमोल धाबळे, पूनम चव्हाण यांनी सादर केला.

**दि. ८ सप्टेंबर २०१२ : कथा व काव्यस्पर्धा पुरस्कार सोहळा :**

दीपध्वज कोसोदे – 'पंचनामा' स्नेहसुधा कुलकर्णी 'सावलीच्या शोधात' या पुस्तकांना डॉ. वासुदेव रायते व डॉ. माधवी रायते यांच्या हस्ते सदर पुरस्कार देण्यात आले.

याचवेळी 'खिचडी' या विनोदी कथासंग्रहाचे प्रकाशन (लेखक गंगाधर वाघमोडे) झाले.

**दि. १६ सप्टेंबर २०१२ : प्रथम वर्धापन दिन :**

श्रीधर माडगुळकर यांच्या 'मंतरलेल्या आठवणी' या कार्यक्रमाने शाखेचा प्रथम वर्धापन दिन साजरा झाला. डॉ. श्रीकांत येळेगावकर यांचा सत्कार करण्यात आला.

**४) ठाणे शाखा : ६ ऑक्टोबर २०१२** रोजी ठाणे नगर वाचन मंदिर आणि मसाप ठाणे शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित 'प्रा. म. वि. फाटक' स्मृतिव्याख्यान प्रा. मिलिंद जोशी यांनी दिले. आचार्य अत्रे आणि पु. लं. देशपांडे : विनोदाची दोन शिखरे हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता. पद्माकर शिरवाडकर यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले. अध्यक्षस्थानी य. रा. साने होते. पां. के. दातार उपस्थित होते.

**१५ डिसेंबर २०१२ :** गझलकार दीपक करंदीकर यांचा अक्षरधुनी आणि अक्षयधुनी हा कार्यक्रम मसाप ठाणे शाखा आणि नगर वाचन मंदिराने आयोजित केला होता. बंडा जोशी यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

◇◇◇

**शाखा कार्यवृत्त नोंद (संकलक) : दीपक करंदीकर**
कार्यवाह, म.सा.प. पुणे.

---

**नवीन आजीव सभासद**

हुल्याळकर मिलिंद, तळेगाव
जोशी शरदराव, तळेगाव
पुराणिक उषा विजय, तळेगाव
देशपांडे अजित दिगंबर, तळेगाव
पवार शामलता जयंत, तळेगाव
देशपांडे देवीदास, तळेगाव
सुळे संजीव माधव, तळेगाव
साताळकर रवींद्र रामचंद्र, अ. नगर
कोठारी स्नेहल एस., पिंपरी
कोठारी संगीता स्नेहल
लाखे प्रियांका राजन
लाखे रीचा राजन, चिंचवड
बापट संध्या मकरंद, निगडी
बुडुख धनंजय माधवराव, चिंचवड
जगताप विजय काशिनाथ, चिंचवड
वैद्य नीता विद्याधर, आकुर्डी
आंबोरे नितीन शाहुराव, पुणे
कोकाटे श्रीमंत शिवाजी, पुणे
गुमास्ते अशोक केशव, चिंचवड
देव गजानन रघुनाथ, पुणे
माने वसंतराव मारुती, पुणे
फुलंब्रीकर प्रिया माधव, पुणे
साळुंके दीपक गणपतराव, कोपरगाव
ढेरे विठ्ठल ऊर्फ तात्या गोविंदराव, कर्जत
दंडिमे उत्तम गोविंदराव, आकुर्डी
वाकनीस रमेश यशवंत, निगडी
मंगरूळकर माधुरी विनोद, आकुर्डी



अनुक्रमणिका



(स्व.) यशवंतरावजी चव्हाण यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने मसापने सुरू केलेल्या 'मज्जाच मजा' या बालकुमारांच्या पहिल्या त्रैमासिकाचे प्रकाशन केंद्रिय कृषिमंत्री शरद पवार यांच्या हस्ते झाले. त्यावेळी विधानसभेचे सभापती दिलीप वळसे पाटील, पुण्याच्या महापौर वैशाली बनकर, अंकुश काकडे, शांतीलाल सुरतवाला, डॉ. माधवी वैद्य, प्रा. मिलिंद जोशी आणि सुनिल महाजन उपस्थित होते.



मसाप शाखा फलटण आणि जिल्हा परिषद, सातारा यांच्यावतीने तीन दिवसाचे यशवंतराव चव्हाण मराठी साहित्य संमेलन ज्येष्ठ कवी डॉ. ना. धों. महानोर यांच्या अध्यक्षतेखाली झाले. संमेलनाच्या उद्‌घाटनप्रसंगी (डावीकडून) बापूसाहेब देशपांडे, रामराजे नाईक निंबाळकर, जलसंपदा मंत्री सुनील तटकरे, रविंद्र बेडकिहाळ, डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, ना. धों. महानोर, उल्हासदादा पवार, विजय कोलते, साहित्य महामंडळाच्या अध्यक्षा प्रा. उषा तांबे आणि दिलीपसिंह भोसले.

**Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : October to December 2012**
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*



बुक-पोस्ट




प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

अनुक्रमणिका



